# महाराष्ट्र विधानपरिषद

## तिसरे (हिवाळी) अधिवेशन, २०१८

---

## अतारांकित प्रश्नोत्तरांची यादी

**प्रश्नांची एकूण संख्या - ५०**

---

### नांदेड जिल्ह्यातील आदिवासी आश्रमशाळेत विविध प्रवर्गातील पदे रिक्त असल्याबाबत

**(१) १७३८ (२९-०१-२०१५). श्री.विक्रम काळे :** सन्माननीय **आदिवासी विकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) नांदेड जिल्ह्यातील १७ आदिवासी आश्रमशाळेत विविध प्रवर्गातील सुमारे ६८ पदे रिक्त असल्याचे माहे डिसेंबर, २०१३ च्या दुसऱ्या सप्ताहात निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर पदे रिक्त ठेवण्याची कारणे काय आहेत,

(३) तसेच सदर आदिवासी आश्रमशाळेतील विद्यार्थ्यांचे नुकसान होवू नये म्हणून सदर पदे भरणेबाबत शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विष्णु सवरा (१५-११-२०१८) :** (१) होय, हे खरे आहे.

(२) बदली, पदोन्न्ती, सेवानिवृत्ती व राजीनामा इ.कारणामुळे पदे रिक्त राहिली आहेत.

(३) सदर रिक्त पदांबाबत २०१८ मध्ये खालीलप्रमाणे कार्यवाही करण्यात येत आहे.

१. रिक्त पदांवर संबंधित शाळेतील ज्येष्ठ शिक्षकांकडे अतिरिक्त कार्यभार सोपविण्यात आले आहेत.
२. बंद पडलेल्या अनुदानित आश्रमशाळेतील शिक्षकांचे तात्पुरते समायोजन केले व तासिका तत्वावर शिक्षण नेमण्यात आले आहेत.
३. चतुर्थश्रेणी कर्मचारी यांची २५ टक्के पदे निरसन केल्यामुळे स्वयंपाकी, कामठी पदे जास्त झाले आहे त्यांच्याकडून बहूउद्देशीय पदे म्हणून चतुर्थश्रेणी पदाचे काम करुन घेण्यात येत आहेत.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्यातील पोलीस ठाण्यातील दैनिक गुन्हे नोंदी ऑनलाईन करण्याबाबत

**(२) ४५०१ (१०-०४-२०१५). श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) ठाणे पोलीस आयुक्तालयाच्या हद्दीत घडणारा प्रत्येक गुन्हा, त्याची तपास प्रक्रिया, कोर्टात त्या प्रकरणी होणारी सुनावणी या साऱ्या नोंदी डेली क्राईम रिपोर्ट आता ऑनलाईन पध्दतीने करण्यास सुरवात झाली असल्याचे दिनांक २२ जानेवारी, २०१५ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, राज्यातील सर्व पोलीस ठाण्यात डेली क्राईम रिपोर्ट ऑनलाईन करण्यासंदर्भात शासनाने काय निर्णय घेतला आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१७-११-२०१८) :** (१) व (२) होय, हे खरे आहे.

ठाणे पोलीस आयुक्तालयाच्या हद्दीत घडणारा प्रत्येक गुन्हा, त्याची तपास प्रक्रिया तसेच सर्व प्रकारच्या नोंदी डेली क्राईम रिपोर्ट आता

सीसीटीएनएस (Crime and Criminal Tracking Network System) मध्ये ऑनलाईन पध्दतीने करण्यास सुरुवात झाली आहे. तसेच सर्व पोलीस स्टेशनकडून सीसीटीएनएस मध्ये दाखल व फिडींग होणारे IIF-१ ते IIF-७ पर्यंतची माहिती संकलित करुन प्रत्येक महिन्याला राज्य गुन्हे अन्वेषण विभाग, पुणे यांना आकडेवारी स्वरुपात सादर करण्यात येते. कोर्टात त्या प्रकरणी होणाऱ्या सुनावणीच्या नोंदी (Court Disposal IIF-६) ऑनलाईन पध्दतीने भरण्यास सुरुवात करण्यात आली आहे.

सीसीटीएनएस प्रकल्पाव्दारे डेली क्राईम रिपोर्टमध्ये माहिती प्राप्त होवू शकते.

(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्यातील आदिवासी आश्रमशाळांमध्ये सोयीसुविधा उपलब्ध करुन देण्याबाबत

**(३) ५०६६ (२०-०४-२०१५). श्री.अनिल भोसले, श्री.ख्वाजा बेग :** सन्माननीय **आदिवासी विकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील आदिवासी आश्रमशाळांमधील मुला-मुलींना सोयीसुविधा पुरविण्याचे आदेश मा.उच्च न्यायालयाने शासनास माहे जानेवारी, २०१५ च्या पहिल्या सप्ताहात दिले आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विष्णु सवरा (१६-११-२०१८) :** (१) व (२) राज्यातील आश्रमशाळांमधील सोयी सुविधांबाबतच्या उपलब्धतेबाबतची टाटा इन्स्टीट्युट ऑफ सोशल सायन्सेस, मुंबई या त्रयस्त संस्थेकडून करण्याबाबतचे निर्देश मा.उच्च न्यायालय यांनी दिले होते. त्यास अनुसरुन विभागाने टाटा इन्स्टीट्युट ऑफ सोशल सायन्सेस, मुंबई यांच्या सदस्यांचा समावेश करुन त्यांचे

सनियंत्रणाखाली सामाजिक न्याय, महिला व बालविकास व ग्रामविकास या विभागाचे अधिकारी व कर्मचारी यांचा समावेश करुन ऑगस्ट, २०१४ मध्ये सर्व आश्रमशाळांची तपासणी करण्यात आली. सदर तपासणी अहवालाचे विश्लेषण करत TISS ने ऑगस्ट, २०१६ मध्ये शासनास अहवाल सादर केला.

त्यानुसार मुलभूत सुविधांच्या आधारे आश्रमशाळांचे अ, ब, क, व ड असे वर्गीकरण करण्यात आले. त्यांच्या अहवालानुसार एकूण शाळांपैकी १६७ इतक्या शाळा क व ड वर्गात होत्या. त्यामध्ये ६ महिन्यात सुधारणा करण्याची शिफारस होती. त्यानुसार आश्रमशाळांना नोटीस देऊन सुधारणा करण्याबाबत कळविले होते. विभागाच्या अधिकाऱ्यांनी सन २०१७ मध्ये केलेल्या तपासणीमध्ये बहुतांशी आवश्यक सुधारणा केल्याचे निदर्शनास आले आहे.

(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## जळगाव जिल्हयात अवैधरित्या वाळू उपसा होत असल्याबाबत

**(४) ६०५३ (२०-०४-२०१७). श्रीमती स्मिता वाघ :** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) जळगाव जिल्हयात पाचोरा, जळगाव, अमळनेर येथे वाळू तस्करीचे किती गुन्हे दाखल झाले आहेत,

(२) असल्यास, अवैध रित्या वाळू उपसा किती प्रमाणात झाली आहे,

(३) असल्यास, वाळू तस्करी रोखण्यासाठी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (०१-१०-२०१८) :** (१) सन २०१७-१८ मध्ये जळगांव जिल्हयात अवैध वाळू उत्खनन/वाहतूकीच्या प्रकरणात पाचोरा तालुक्यात ३ गुन्हे, जळगांव तालुक्यात ६४ गुन्हे तसेच अमळनेर तालुक्यात ६ गुन्हे दाखल करण्यात आले आहेत.

(२) व (३) जळगांव जिल्ह्यात सन २०१७-१८ मध्ये पाचोरा तालुक्यात ९५ ब्रास अवैध वाळू उपसा व वाहतूक प्रकरणी ७९ वाहनांवर दंडात्मक कारवाई करुन रुपये २४.८३ लक्ष इतकी रक्कम वसूल करण्यात आली आहे.

जळगाव तालुक्यात ४२५ ब्रास अवैध वाळू उपसा व वाहतूक प्रकरणी १८६ वाहनांवर दंडात्मक कारवाई करुन रुपये १७.८७ लक्ष इतकी रक्कम वसूल करण्यात आली आहे.

अंमळनेर तालुक्यात ३२६ ब्रास अवैध वाळू उपसा व वाहतूक प्रकरणी ९६ वाहनांवर दंडात्मक कारवाई करुन रुपये १३.०३ लक्ष इतकी रक्कम वसूल करण्यात आली आहे.

जळगांव जिल्हास्तरावर व तालुकास्तरावर अवैध गौण खनिज उत्खनन व वाहतूकीस प्रतिबंध करण्यासाठी पथकांची स्थापना करण्यात आली असून त्यांचेमार्फत नियमितपणे कारवाई करण्यात येते. तसेच मंजूर लिलावातील वाळूस्थळावरुन वाळूचे अवैधरित्या उत्खनन होऊ नये तसेच अटी व शर्तीचा भंग होऊ नये यासाठी उपविभागीय अधिकारी यांचे अध्यक्षतेखाली समिती गठीत करण्यात आली असून त्यांचेमार्फत नियमितपणे लिलावात गेलेल्या वाळूस्थळांची तपासणी करण्यात येते.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## पूर्णा तालुक्यातील (जि.परभणी) पांगरा ढोणे येथील शेतकऱ्यांना अनुदानाच्या स्वरूपात बियाणे व खते पुरविण्याबाबत

**(५) १९३७० (१९-०८-२०१६). श्री.जयंत पाटील :** सन्माननीय **कृषी मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) पांगरा ढोणे (ता.पूर्णा, जि.परभणी) येथील शेतकऱ्यांनी अनुदानाच्या स्वरूपात बियाणे व खते मिळण्यासाठी २५ फुट कोरड्या विहिरीत दिनांक २२ मे, २०१६ रोजीपासून बेमुदत उपोषणास सुरूवात केली, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करून शेतकऱ्यांना अनुदानाच्या स्वरूपात बियाणे व खते पुरविण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (१२-११-२०१८) :** (१) होय, हे खरे आहे.

(२) पूर्णा तालुक्यात सन २०१५-१६ मध्ये राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियानांतर्गत सलग पीक प्रात्यक्षिके व आंतरपीक प्रात्यक्षिके यांचा अनुक्रमे ४०० हेक्टर व २०० हेक्टरचा कार्यक्रम राबविण्यात आला आहे. याच बरोबर तालुक्यात वैरण विकास योजनेंतर्गत मका, ज्वारी व नुट्रीफीड या पिकाचे अनुक्रमे २६ क्विंटल, १५६ क्विंटल व १३ क्विंटल बियाणांचे १०० टक्के अनुदानावर वाटप करण्यात आलेले आहे. तसेच, राष्ट्रीय कृषी विकास योजनेंतर्गत तुर, ICPH-२७४० या वाणाचे २५० क्विंटल बियाणे १०० टक्के अनुदानावर वाटप केलेले आहे.

सन २०१६-१७ मध्ये पूर्णा तालुक्यात सलग पीक प्रात्यक्षिके व आंतरपीक प्रात्यक्षिकांचा कार्यक्रम प्रत्येकी ३०० हेक्टर क्षेत्रावर राबविण्यात आलेला आहे.

पीक कर्ज थकबाकीदार पात्र शेतकऱ्यांना दिनांक ५ जुलै, २०१६ रोजीच्या शासन निर्णयानुसार विशेष बाब म्हणून कापूस पिकाचे मोफत बियाणे देण्यात आलेले आहे.

सन २०१५-१६ मध्ये राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियानांतर्गत संबंधित गावातील शेतकऱ्यांना ५० हेक्टर हरभरा पीक प्रात्यक्षिकांतर्गत मंजूर असलेल्या निविष्ठांचे वाटप करण्यात आलेले आहे.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळाकडून सदोष बियाणाच्या पुरवठा केल्याबाबत

**(६) १९४११ (१७-०६-२०१७). श्री.हरिसिंग राठोड :** सन्माननीय **कृषी मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) रोहडा (ता.पुसद, जि.यवतमाळ) येथील शेतकऱ्यांना महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ, अकोला यांनी सोयाबीनचे सदोष बियाणे खरीप हंगाम २०११ मध्ये वा त्यादरम्यान दिले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, महामंडळाकडून सदर शेतकऱ्यांनी १० बॅग विकत घेतल्या मात्र बियाण्याची उगवण कमी असल्याने शेतकऱ्यांनी नुकसानीपोटी मदतीची मागणी महामंडळाकडे केली, परंतु महामंडळाने शेतकऱ्यास मदत देण्यास नकार दिल्याचे माहे मे, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले तद्नुसार नुकसानग्रस्त शेतकऱ्यांना मदत देण्याबाबत तसेच, शेतकऱ्यांची मदत नाकारणाऱ्या दोषी अधिकाऱ्यांवर कारवाई करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (१२-११-२०१८) :** (१), (२) व (३) हे खरे नाही.

खरीप हंगाम २०११ मध्ये महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ मर्यादीत (महाबीज), अकोला यांनी मौजे रोहडा व बेलोरा, ता.पुसद, जि.यवतमाळ येथील बीजोत्पादक शेतकऱ्यांना सोयाबीन जेएस-३३५ या वाणाचे एकूण ५४.०० क्विंटल बियाणांचे वाटप केलेले होते.

सदर बियाणांची उगवणशक्ती कमी असल्याबाबतच्या ५ तक्रारी रोहडा येथील बीजोत्पादक शेतकऱ्यांनी कृषी विभागाकडे दाखल केलेल्या आहेत. या संदर्भात सदर प्रकरण राज्य ग्राहक तक्रार निवारण मंच, अमरावती येथे न्यायप्रविष्ट आहे. या संदर्भात सदर लॉटच्या बियाणांची उगवणशक्ती समाधानकारक होती, असे इतर बीजोत्पादक शेतकऱ्यांनी कळविलेले आहे.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## दक्षिण सोलापूर (जि.सोलापूर) तालुक्यात चारा छावणी सुरू करण्याबाबत

**(७) २०३१५ (१९-०८-२०१६). श्री.रामहरी रुपनवर :** सन्माननीय **मदत व पुनर्वसन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) दक्षिण सोलपूर (जि.सोलापूर) तालुक्यात दुष्काळी परिस्थितीमुळे जनावरांचे चारा पाण्याविना हाल होत असल्यामुळे येथे चारा डेपा अथवा छावणी सुरु करण्याबाबतची मागणी शेतकऱ्यांनी माहे एप्रिल, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान केल्याचे निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशी काय आढळून आले व तद्नुसार चारा डेपो अथवा चारा छावणी सुरू करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (३१-१०-२०१८) :** (१) होय, हे खरे आहे.
(२) जिल्हा पशुसंवर्धन उपायुक्त, सोलापूर यांचा दिनांक ३०/४/२०१६ रोजीच्या दैनिक अहवालानुसार दक्षिण सांलापूर तालुक्यामध्ये ४३५६६.२ मे. टन चारा उपलब्ध होता. सदर उपलब्ध चारा माहे मे, २०१६ अखेर पर्यंत पुरणार असल्याने दक्षिण सोलापूर तालुक्यामध्ये चारा छावणी सुरू करण्यात आली नाही.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## शासनाने मिठागाराच्या जमिनी विकणे आणि उडडाणपुलांच्या खालच्या जमिनी भाडेतत्वावर देऊन महसूल वाढविण्याबाबत

**(८) २४१०३ (३०-१२-२०१६). ॲड.अनिल परब :** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) शासनाने मिठागाराच्या जमिनी विकणे आणि उड्डाणपुलांच्या खालच्या जमिनी भाडेतत्वावर देऊन महसूल वाढविण्याबाबतचा निर्णय माहे सप्टेंबर, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान घेतला आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदरहू जागा शासनाने कोणत्या निकषाखाली व कोणत्या कारणासाठी देण्यात येणार आहे,

(३) असल्यास, आतापर्यंत किती जागाचे वाटप करण्यात आले आहे व त्यातून किती महसूल जमा करण्यात आला आहे ?

**श्री.चंद्रकांत पाटील (१६-१०-२०१८) :** (१) महसूल वाढविण्यासाठी मिठागराच्या जमिनी विकण्याचा आणि उड्डाणपुलाच्या खालच्या जमिनी भाडेतत्वावर देण्याचा निर्णय महसूल विभागाने घेतलेला नाही.
(२) व (३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## हिंगणघाट (जि.वर्धा) तालुक्यातील शेतकऱ्यांना बोगस बियाणे पुरविणाऱ्या कंपनीवर कारवाई करण्याबाबत

**(९) २५२३१ (३०-१२-२०१६). प्रा.अनिल सोले :** सन्माननीय **कृषी मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) हिंगणघाट (जि.वर्धा) तालुक्यातील यशोदा सिड्स व राइजिंग कंपनीने शेतकऱ्यांना बोगस बियाण्यांचा पुरवठा करुन शेतकऱ्यांची फसवणूक केल्याने सदर कंपनीला काळ्या यादीत टाकण्याचा प्रस्ताव कृषी विभाग, भंडारा जिल्हा परिषद यांनी शासनास सादर केल्याचे दिनांक ४ ऑक्टोबर, २०१६ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करून सदर सिड्स कंपनीवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (०३-१०-२०१८) :** (१) होय.
(२) या संदर्भात सदर तक्रारींच्या अनुषंगाने चौकशी केली असून, यशोदा हायब्रीड सिड्स प्रा.लि. हिंगणघाट व राइजिंग सन सिड्स कंपनी, नागपूर या कंपन्यांच्या बियाणांमध्ये दोष असल्याची बाब निदर्शनास आलेली आहे.

बीज प्रक्रियेतील चुकीमुळे उगवण क्षमतेवर परिणाम झाल्याचे निदर्शनास आले. बियाणांस केलेल्या कलर कोटींगकरीता वापरलेले

सुपरकोटमुळे बियाणांच्या उगवण शक्तीवर परिणाम झालेला होता.सदरची बाब कंपनीच्या लक्षात आल्याने कंपनीने शेतकऱ्यांना तात्काळ भात बियाणे बदलून दिलेले आहे.

यशोदा हायब्रीड सिड्स प्रा.लि. हिंगणघाट (जि.वर्धा) यांच्या परवाण्यामधील भात जयश्रीराम, जयश्रीराम गोल्ड, शबरी व ओम-३ या वाणांचे तसेच रायझिंग सन्स सिड्स प्रा.लि. नागपूर यांच्या परवाण्यामधील भात वायएसआर, पवनपुत्र, मनिषा, बलवान व बिदान या वाणांचे निलंबन करण्यात आलेले आहे. तसेच एकूण २७२ नमुने हे प्रयोगशाळा तपासणीकरीता घेण्यात आलेले होते. यापैकी ५३ नमुने हे अप्रमाणित आढळून आल्याने त्यावर न्यायालयीन खटले दाखल करण्यात आलेले आहेत.

(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्यातील आत्महत्याग्रस्त शेतकऱ्यांच्या वारसांना स्वालंबन योजनेतील रिक्षा परवानातील त्रुटी दूर करण्याबाबत

**(१०) २६५९२ (३०-१२-२०१६). श्री.सतेज ऊर्फ बंटी पाटील :** सन्माननीय **परिवहन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील आत्महत्याग्रस्त शेतकऱ्यांच्या वारसांना असणाऱ्या स्वावलंबन योजनेतील रिक्षा परवानातील त्रुटी दूर करण्याबाबत कोल्हापूर येथील जनता नागरी निवास संघटना यांनी मा.पालकमंत्री, कोल्हापूर यांना माहे जून, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान लेखी निवेदन दिले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व तद्‌नुसार सदर निवेदनाची दखल घेवून निवेदनातील मागण्यांबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.दिवाकर रावते (१६-११-२०१८) :** (१) व (२) अशा आशयाचे निवेदन परिवहन आयुक्त कार्यालय तसेच प्रादेशिक परिवहन कार्यालय, कोल्हापूर येथे प्राप्त झालेले नाही.

तथापि, दिनांक २१/०१/२०१६ रोजीच्या शासन निर्णयान्वये "हिंदुहृदयसम्राट शिवसेनाप्रमुख बाळासाहेब ठाकरे निराधार स्वावलंबन योजना" राबविण्यात आलेली आहे. सदर योजनेव्दारे "विशेष बाब" म्हणून आत्महत्याग्रस्त शेतकरी कुटुंबातील मयत शेतकऱ्यांच्या विधवा पत्नीच्या नावे ऑटोरिक्षा परवाना वितरीत करण्याच्या तरतूदी विहित करण्यात आलेल्या आहे.

या योजनेची अंमलबजावणी चालू असून अद्यापपर्यंत सदर योजनेखाली राज्यात एकुण १०६१ अर्ज प्राप्त झाले असून पैकी ७४१ जणांना इरादापत्र देण्यात आले आहे. तसेच एकूण ३८२ आत्महत्या केलेल्या शेतकऱ्यांच्या विधवा महिलांना ऑटोरिक्षा परवाने देण्यात आले आहेत.

(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## रस्ते विकास महामंडळ, महामार्ग प्राधिकरण, राष्ट्रीय महामार्ग विभाग या खात्यांचा समन्वय साधून एक समन्वयक नेमण्याबाबत

**(११) २६६०२ (३०-१२-२०१६). श्री.सतेज ऊर्फ बंटी पाटील :** सन्माननीय **सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम) मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात एक रस्ता रस्ते विकास महामंडळाकडे, दुसरा महामार्ग प्रधिकरणाकडे, तिसरा राष्ट्रीय महामार्ग विभागाकडे तर उर्वरित सार्वजनिक बांधकाम विभागाकडे अशी स्थिती असल्याने एका अनुचित प्रकारावेळी नेमकी जबाबदारी कोणाची असा प्रश्न उपस्थित झाला असल्याचे माहे ऑगस्ट, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, अशातच यापैकी महत्वाची कार्यालये कोल्हापूर येथे नसल्याने जिल्ह्यातील रस्त्यांसदर्भात आंदोलन करताना नेमकी दाद कोणाकडे मागायची अशी परिस्थिती निर्माण झाली आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, यासंदर्भात शासनाने निर्णय घेवून सदर खात्यांचा समन्वय साधून एक समन्वयक नेमण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.एकनाथ शिंदे (१५-११-२०१८) :** (१) अशी बाब शासनस्तरावर निदर्शनास आली नाही.

(२) अशी बाब शासनस्तरावर निदर्शनास आली नाही.

(३) अशा प्रकारचा निर्णय शासनस्तरावरुन घेण्यात आलेला नाही.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## हवामान आधारित फळपीक विमा योजनेतील केळी उत्पादक शेतकऱ्यांना नुकसान भरपाई मिळण्याबाबत

**(१२) २७६५२ (१३-०४-२०१७). श्रीमती विद्या चव्हाण, श्री.धनंजय मुंडे, श्री.हेमंत टकले, ॲड.निरंजन डावखरे, श्री.अमरनाथ राजूरकर, श्री.सुभाष झांबड, श्री.शरद रणपिसे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.आनंदराव पाटील, श्री.रामहरी रुपनवर, प्रा.जोगेन्द्र कवाडे :** सन्माननीय **कृषी मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) नांदेड जिल्ह्यातील केळी उत्पादक बहुसंख्य शेतकऱ्यांच्या शेतीचे नुकसान होऊनही विमा परताव्यासाठी आधार असलेल्या चुकीच्या हवामानाच्या नोंदी ठेवल्यामुळे त्यासाठी लावलेली यंत्रे कुठे लावली याचा पंचनामा करुन कार्यवाही करण्याचे आदेश मा.कृषी राज्यमंत्री यांनी दिनांक १० जानेवारी, २०१७ रोजी वा त्यासुमारास दिले आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व तद्नुसार नुकसान झालेल्या शेतकऱ्यांना विम्याची नुकसान भरपाई देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (२५-०९-२०१८) :** (१) हे खरे आहे की, मा.राज्यमंत्री (कृषी) यांनी महसूल मंडळातील स्वयंचलीत हवामान केंद्रे विहित निकष पूर्ण करतात किंवा नाही यांचा पंचनामा करुन कार्यवाही करण्याबाबची बैठक दिनांक १० जानेवारी, २०१७ रोजी आयोजित केली होती.

(२) सन २०१५-१६ आंबिया बहार सदर योजनेंतर्गत नांदेड जिल्हयामध्ये १९ हवामान केंद्रे स्थापन करण्यात आली होती. सदर हवामान केंद्रावर नोंद झालेल्या हवामानाची आकडेवारी महाराष्ट्र शासनाच्या संकेत स्थळावर भारतीय कृषी विमा कंपनीने प्रसिध्द केली आहे. विमा संरक्षित कालावधीत सर्व स्वयंचलीत हवामान केंद्रे कार्यरत होती. महसूल मंडळस्तरावरील संदर्भ हवामान केंद्रावर नोंद झालेली हवामानाची आकडेवारी व राज्य शासनामार्फत अधिसूचित केलेल्या पिकनिहाय क्षेत्रनिहाय प्रमाणकावर काही शेतकरी नुकसान भरपाई पात्र होत नाही.

सन २०१५-१६ मध्ये आंबिया बहारामध्ये केळी या फळ पिकासाठी नांदेड जिल्हयातील ८,१८८ शेतकऱ्यांनी ६,३००.४७ हेक्टर क्षेत्रावर सहभाग घेतला. त्यासाठी रुपये ६९.९४ कोटीचे विमा संरक्षण देण्यात आले होते. त्यासाठी शेतकऱ्यांनी रुपये ४.२० कोटी रक्कम विमा हप्त्यापोटी भरलेले होती. त्यापैकी २,८८१ शेतकऱ्यांना रुपये ३.२५ कोटी इतकी विमा नुकसान भरपाई भारतीय कृषी विमा कंपनीने दिनांक १० ऑक्टोंबर, २०१६ रोजी शेतकऱ्यांच्या बँक खाती जमा केली आहे.

(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## शेलू (ता.आर्णी, जि.यवतमाळ) येथील एकाच कुटुंबातील वडील व मुलगा यांनी आत्महत्या केल्याबाबत

**(१३) ३०६४९ (१३-०४-२०१७). श्री.रामहरी रुपनवर :** सन्माननीय **मदत व पुनर्वसन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) शेलू (ता.आर्णी, जि.यवतमाळ) येथील एकाच कुटुंबातील वडील व मुलगा यांनी आत्महत्या केली, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, आत्महत्याग्रस्त कुटुंबातील एकाच मृत व्यक्तीच्या नावे अर्थ सहाय्य मिळाले, हे ही खरे आहे काय ?

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करून आत्महत्याग्रस्त दोन्ही व्यक्तींच्या वारसास आर्थिक सहाय्य देण्याबाबत काय कार्यवाही केली,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (१०-१०-२०१८) :** (१) होय.

(२) व (३) शेलू (ता.आर्णी, जि.यवतमाळ) येथील काशीराम चंद्रभान मुधोळकर वय ४८ रा.शेलू से., ता.आर्णी व त्यांचा मुलगा अनिल काशीराम मुधोळकर, वय २३, रा.शेलू से., ता.आर्णी या एकाच कुटुंबातील दोन व्यक्तींनी दिनांक २३/०८/२०१६ रोजी गळफास लावून आत्महत्या केली होती.

उपरोक्त दोन्ही प्रकरणे दिनांक १४/१०/२०१६ रोजी जिल्हास्तरीय समितीच्या सभेमध्ये निर्णयाकरीता ठेवण्यात आली असता, जिल्हा समितीने प्रकरणात उपलब्ध असलेल्या कागदपत्रावरुन तपासणी केली असता सतत तीन वर्षापासून होत असलेली नापिकी तसेच थकीत कर्जामुळे मृतक काशीराम चंद्रभान मुधोळकर यांनी आत्महत्या केल्याचे निदर्शनास आले, त्यामुळे समितीने सदर प्रकरण पात्र ठरविले.

तथापि मृतक अनिल काशीराम मुधोळकर हा सतत आजारी असायचा त्याने अकोला व यवतमाळ येथील मानसोपचारतज्ञाकडून औषधोपचार घेतला होता, सदर आत्महत्या शेती विषयक कारणाने झाली नसल्याचे निदर्शनास आल्यामुळे समितीने सदर प्रकरण अपात्र ठरविले.

दिनांक २३ जानेवारी, २००६ च्या शासन निर्णयानुसार आत्महत्याग्रस्त शेतकऱ्यांच्या वारसांना रुपये १.०० लक्ष प्रमाणे तातडीची आर्थिक मदत देण्यात आलेली आहे.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## उमरखेड (जि.यवतमाळ) तालुक्यातील अवैध प्रवासी वाहतुक रोखण्याबाबत

**(१४) ३०६६९ (१५-०४-२०१७). श्री.रामहरी रुपनवर :** सन्माननीय **परिवहन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) उमरखेड (जि.यवतमाळ) तालुक्यात अवैध प्रवासी वाहतुकीमुळे अपघाताच्या प्रमाणात वाढ झाल्याचे निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने अवैध प्रवासी वाहतुक बंद करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.दिवाकर रावते (१८-०९-२०१८) :** (१) व (२) पोलीस विभागाकडून प्राप्त माहितीनुसार सन २०१५ व २०१६ च्या तुलनेत माहे जानेवारी, २०१७ ते जून, २०१७ या कालावधीत अवैध प्रवासी वाहतूकीमुळे अपघातात उमरखेड परिसरात वाढ झाल्याचे दिसून येते. उपप्रादेशिक परिवहन कार्यालय, यवतमाळ यांचे वायुवेगपथक व महसूल सुरक्षा पथकाद्वारे यवतमाळ जिल्ह्यातील अवैध प्रवासी वाहतूकीविरुध्द माहे एप्रिल, २०१६ ते माहे मार्च, २०१७ या कालावधीत १०७५ दोषी वाहनांवर कार्यवाही करून ५३१ दोषी वाहनांची नोंदणी निलंबित करण्यात आलेली आहे. तसेच रुपये १७,६५,४५०/- इतका दंड वसूल करण्यात आलेला आहे.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## वीज कोसळून मृत पावलेल्या व्यक्तींच्या नातेवाईकांना मदत देण्याबाबत

**(१५) ३२९०३ (०७-०८-२०१७). श्री.प्रकाश गजभिये :** सन्माननीय **मदत व पुनर्वसन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) वीज कोसळून मृत पावलेल्या व्यक्तींचा मृत्यू हा नैसर्गिक आपत्तीमुळे झाला असे मानण्याचा निर्णय शासनाने माहे मे, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान घेतला आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, त्यानुसार आतापर्यंत किती व्यक्तींच्या नातेवाईकांना आर्थिक मदत देण्यात आली आहे,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने वीज कोसळून मृत्यूमुखी पडलेल्या व्यक्तींच्या नातेवाईकांना आर्थिक मदत देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (०५-१०-२०१८) :** (१) होय.

(२) व (३) राज्यात वीज कोसळून २५० व्यक्तींचा मृत्यू झाला असल्याची बाब निदर्शनास आली आहे. त्यापैकी २४८ मृत व्यक्तींच्या वारसांना शासन निर्णय दिनांक १३/०५/२०१५ मधील तरतूदींनुसार प्रत्येकी ४ लक्ष मदत देण्यात आली आहे. उर्वरित २ प्रकरणांमध्ये आवश्यक कागदपत्राची पूर्तता झालेली नाही.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## माळी वाडा (ता.पाथरी, जि.परभणी) येथील जमीन मोजणीबाबत

**(१६) ३३८३९ (०७-०८-२०१७). श्री.अब्दुल्लाखान दुर्राणी :** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) माळी वाडा (ता.पाथरी, जि.परभणी) येथील सर्व्हे नं. ६७ मधील जमीन मोजण्याबाबत आदेश होऊनही तहसिलदार व उपविभागीय अधिकारी, पाथरी यांनी नियमबाह्यरित्या स्थगिती दिल्याने त्यांची चौकशी होऊन त्यांच्याविरूध्द कार्यवाही करण्यात यावी, अशी मागणी परभणी येथील स्थानिक लोकप्रतिनिधींनी सन २०१७ मध्ये वा त्यादरम्यान जिल्हाधिकारी, परभणी यांच्याकडे लेखी निवेदनाद्वारे केली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व तद्नुसार जमिनीची मोजणी करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (१४-११-२०१८) :** (१) असे निदर्शनास आले नाही.

(२) प्रश्न उद्भवत नाही.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## नागपूर येथील शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालयांच्या सुरक्षेसाठी सीसीटीव्ही कॅमेरे लावण्याबाबत

**(१७) ३५६३५ (०२-०१-२०१८). प्रा.जोगेन्द्र कवाडे, प्रा.अनिल सोले, श्री.नागोराव गाणार, श्री.गिरीशचंद्र व्यास :** सन्माननीय **वैद्यकीय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) नागपूर येथील शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालयांच्या सुरक्षेसाठी सीसीटीव्ही कॅमेरे लावण्यात आले असून त्यात वाढ करुन ४० कॅमेरे बसविण्याबाबतचा प्रस्ताव वैद्यकीय संचालकांकडे सन २०१६ मध्ये वा त्यादरम्यान पाठविण्यात आला असून त्यास एक वर्षाचा कालावधी उलटूनही त्यावर कोणतीही कार्यवाही करण्यात आलेली नाही, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.गिरीष महाजन (१३-११-२०१८) :** (१) हे खरे आहे.

संबंधित संस्थेने ४० सीसीटिव्ही व १० पीटीझेड कॅमेरे मागणीबाबत संचालक, वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन, मुंबई यांच्याकडे प्रस्ताव सादर केला होता तथापि सदर प्रस्ताव परिपूर्ण नव्हता.

(२) व (३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यातील रस्त्यांची कामे इंजिनिअरिंग प्रोक्युरमेंट अॅण्ड कन्स्ट्रक्शन (३ पीसी) तत्वावर करण्याबाबत

**(१८) ३५७६४ (०३-०१-२०१८). प्रा.जोगेन्द्र कवाडे, श्री.नागोराव गाणार, प्रा.अनिल सोले, श्री.गिरीशचंद्र व्यास :** सन्माननीय **सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम वगळून) मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील रस्त्यांची कामे इंजिनिअरिंग प्रोक्युरमेंट अॅण्ड कन्स्ट्रक्शन (३ पीसी) तत्वावर करण्यासाठी बॉण्डद्वारे निधी उभारण्यास मा.मुख्यमंत्री

यांनी तत्वत: मान्यता दिली असल्याचे माहे ऑक्टोबर, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, रस्त्यावरील खड्डे भरण्यासाठी जेट पॅचर तंत्रज्ञानाचा वापर करण्यात येणार आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करून कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (०५-११-२०१८) :** (१) होय, हे खरे आहे.

हायब्रीड ॲन्युटी अंतर्गत हाती घेण्यात आलेल्या ज्या कामांना प्रतिसाद मिळाला नाही, त्या कामांना EPC तत्वावर रस्त्याच्या लांबीची सुधारणा करण्याचा कार्यक्रम हाती घेण्याचा शासनाच्या मान्यतेने निर्णय घेण्यात आला आहे.
(२) होय.
(३) व (४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## सायन-पनवेल महामार्गावर पोलीस कर्मचाऱ्याचा मृत्यू झाल्याबाबत

**(१९) ३६०१२ (०४-०१-२०१८). श्री.बाळाराम पाटील, श्री.दत्तात्रय सावंत, श्री.विक्रम काळे, डॉ.सुधीर तांबे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) सायन-पनवेल महामार्गावरील खड्ड्यामुळे मुंबई पोलीस गुन्हे अन्वेषण शाखेत काम करणाऱ्या संतोष शिंदे या पोलीस कर्मचाऱ्याचा दिनांक ८ सप्टेंबर, २०१७ रोजी वा त्यासुमारास मृत्यू झाल्यामुळे या रस्त्याची देखभाल करणाऱ्या कंपनीवर वाशी पोलिसांनी गुन्हा दाखल केला आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, या गुन्ह्यात किती जणांना आणि कोणाकोणाला अटक करण्यात आली आहे व सदर आरोपीना जामीन मिळाला आहे काय,
(३) असल्यास, जामीन मिळण्याची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (२०-११-२०१८) :** (१) होय, हे खरे आहे.

सदरबाबत नवी मुंबई पोलीस आयुक्तालय या घटकाकडील वाशी पोलीस ठाणे गुन्हा रजि.नं.३३१/२०१७ भादंवि ३०४ (अ),३३७ ३३८ प्रमाणे दिनांक ३१/८/२०१७ रोजी सायन-पनवेल टोल वेज प्रा.लि., नवी मुंबई या कंपनीतील संबंधीतांवर गुन्हा दाखल करण्यात आला आहे.

(२) सदर गुन्ह्यात सायन-पनवेल टोल वेज प्रा.लि., नवी मुंबई या कंपनीतील मेन्टेनन्स मॅनेजर सह आणखी एकास दिनांक २७/११/२०१७ रोजी अटक करण्यात आली असून मा.न्यायालयाने दोन्ही आरोपींना जामीनावर मुक्त केले आहे.

(३) नमुद गुन्ह्यात लावण्यात आलेले सर्व कलम हे जामिनपात्र कलम असल्याने मा.न्यायालयाने आरोपींना जामीनावर मुक्त केलेले आहे.

---

## राज्यात मोठ्या प्रमाणात गुटखा विक्री होत असल्याबाबत

**(२०) ३७०१३ (०४-०१-२०१८). श्रीमती स्मिता वाघ :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्य शासनाने सन २०१२ मध्ये गुटखा उत्पादन आणि विक्रीवर बंदी घातल्यानंतर मुंबई तसेच राज्यातील प्रमुख शहरात धाडी टाकून आतापर्यंत किती गुटखा विक्री करणाऱ्या व्यावसायिकांवर पोलिसांच्या आर्थिक गुन्हे शाखा विभागाने गुन्हे दाखल केले आहेत,

(२) असल्यास, माहे ऑक्टोबर, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान सांताक्रुझ परिसरात पोलिसांनी रुपये १ कोटी किंमतीचा गुटखा जप्त केला आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, मुंबई तसेच राज्यातील प्रमुख शहरात बाहेर राज्यातून गुटखा येतो, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करून कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१६-११-२०१८) :** (१) राज्यात गुटखा उत्पादक व त्यांची विक्री करणाऱ्या व्यवसायिकांवर राज्य पोलिसांच्यावतीने सन २०१५ मध्ये ६४६, सन २०१६ मध्ये ३२४ व सन २०१७ (नोव्हेंबर अखेर) मध्ये २५९ गुन्हे दाखल करण्यात आले आहेत.

(२) अंशत: खरे आहे.

सदर प्रकरणी सांताक्रुझ परिसरात रुपये २८,८७,१५०/- किंमतीचा गुटखा जप्त केला आहे.

(३) व (४) मुंबई व राज्यात गुटखा, पानमसाला व तत्सम प्रतिबंधित पदार्थाचे उत्पादन होत नाही. तथापि, शेजारच्या राज्यामध्ये गुटख्याला निर्यात करण्यासाठी परवानगी आहे. त्यामुळे, सदरचा गुटखा चोरटया मार्गाने, वाहतुकीने राज्यामध्ये विक्रीसाठी येतो. संपूर्ण राज्यात सन २०१७-१८ मध्ये ४६३५ अन्न आस्थापनांची तपासणी करुन १३९६ पेढयांवर प्रतिबंधीत अन्न पदार्थाबाबत कारवाई करुन एकुण रुपये ३९,८४,००,७६५/- किंमतीचा साठा जप्त करण्यात आला आहे. तसेच, सन २०१८-१९ मध्ये १६३४ अन्न आस्थापनांची तपासणी करुन ८३५ पेढयांवर कारवाई करुन एकुण रुपये २०,५१,०३,३५२/- किंमतीचा साठा जप्त करण्यात आलेला आहे. प्रतिबंधित अन्न पदार्थावर योग्य तो आळा बसण्यासाठी वेळोवेळी विशेष मोहिम आखून कारवाई करण्यात येते.

(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## नागपूर येथील बारादरी महालाच्या ठिकाणी अतिक्रमण होत असल्याबाबत

**(२१) ३७३९४ (०४-०१-२०१८). डॉ.परिणय फुके :** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) नागपूर येथील ऐतिहासिक वारसा असलेले कस्तुरचंद पार्क येथील भोसले कालीन निर्मित बारादरी महालाच्या ठिकाणी अतिक्रमण होत असल्याचे माहे नोव्हेंबर, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करून कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (१४-११-२०१८) :** (१) व (२) नागपूर मधील कस्तुरचंद पार्क येथील भोसले कालीन निर्मित बारादरी महालाच्या ठिकाणी कोणतेही अतिक्रमण नसून सदर ठिकाणी अतिक्रमण होऊ नये याबाबतची दक्षता जिल्हाधिकारी, नागपूर यांच्यास्तरावर घेण्यात येत आहे.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## कोल्हापूर जिल्ह्यात वरिष्ठ महिला अधिकाऱ्यावर अन्याय होत असल्याबाबत

**(२२) ३७६२९ (०६-०४-२०१८). श्री.सतेज ऊर्फ बंटी पाटील, श्री.शरद रणपिसे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.आनंदराव पाटील, ॲड.हुस्नबानू खलिफे, श्री.रामहरी रुपनवर :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) कोल्हापूर जिल्ह्यात ३१ पोलीस ठाणे असून यातील फक्त एकाच नेसरी पोलीस ठाण्याचा कार्यभार महिला पोलीस अधिकाऱ्याकडे दिला असून काही वरिष्ठ महिला पोलीस अधिकारी मात्र त्यांच्या खात्यातच दुर्लक्षित ठरत असल्याची बाब माहे जानेवारी, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आली आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, स्वतंत्र पोलीस ठाण्याचे कामकाज पाहण्यासाठी महिला पोलीस अधिकारी सक्षम असतानाही त्यांच्यापेक्षा कनिष्ठ असलेल्या पुरुष अधिकाऱ्यांना स्वतंत्र पोलीस ठाणे दिल्याने वरिष्ठ महिला अधिकाऱ्यांवर अन्याय झालेला आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करून सक्षम असलेल्या वरिष्ठ महिला पोलीस अधिकाऱ्यांना स्वतंत्र पोलीस ठाणे देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०५-११-२०१८) :** (१), (२) व (३) पोलीस आयुक्त/ अधीक्षक हे त्यांच्या आस्थापनेवरील कार्यरत असलेल्या नि:शस्त्र पोलीस निरीक्षकांपैकी हुशार, सेवाजेष्ठ, उत्तम सेवाभिलेख असलेल्या नि:शस्त्र पोलीस निरीक्षकांची पोलीस ठाण्याचे प्रभारी अधिकारी म्हणून नेमणूक करतात. त्यामध्ये महिला व पुरुष असा भेदभाव न करता महिला नि:शस्त्र पोलीस निरीक्षकांचाही नेमणुकीत समावेश असतो, त्यांना पोलीस ठाण्याचे प्रभारी अधिकारी म्हणून नेमणूक देण्यात टाळाटाळ करण्यात आलेली नाही. प्रभारी अधिकाऱ्यांना त्यांचे पात्रतेप्रमाणे नेमणूका दिल्या जातात. त्यामध्ये राज्य पोलीस दलातर्फे कोणताही भेदभाव केला जात नाही.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## महाराष्ट्र मोटार वाहन कर कायद्यामधील कलम ३ (अ) व ३ (ब) अंतर्गत केलेल्या कार्यवाहीच्या माहितीबाबत

**(२३) ३७६५४ (०५-०४-२०१८). श्री.सतेज ऊर्फ बंटी पाटील, श्री.शरद रणपिसे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.रामहरी रुपनवर, श्री.आनंदराव पाटील, आर्कि.अनंत गाडगीळ :** सन्माननीय **परिवहन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) महाराष्ट्र मोटार वाहन कर कायद्यामधील कलम ३ (अ) अंतर्गत पर्यावरण कर भरण्याची तरतूद सन २०१० पासून केली आहे, दिनांक ३०/११/२०१७ अखेरपर्यंत राज्यामध्ये १५ वर्षे पूर्ण झालेली अशी किती वाहने आहेत व त्या वाहनांकडून आजपावेतो किती पर्यावरण कर वसूल करण्यात आला आहे, तसेच सदर पर्यावरण कराचा वापर पर्यावरण सुधारणा करण्यासाठी किती करण्यात आला आहे,

(२) असल्यास, महाराष्ट्र मोटार वाहन कायद्यामधील कलम ३ (ब) अंतर्गत रस्ता सुरक्षा उपकर दिनांक २३/०८/२०१६ पासून वसूल करण्यास सुरुवात केली असून आजतागायत रस्ता सुरक्षासाठी किती निधी वापरण्यात आला आहे,

(३) असल्यास, त्यापैकी शालेय विद्यार्थ्यांमध्ये रस्ता सुरक्षा संदर्भात प्रबोधनासाठी किती निधी उपलब्ध करुन देण्यात आला व इतर निधीचा वापर शासनाने कसा केला आहे,

(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करून कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.दिवाकर रावते (१०-०९-२०१८)** : (१) महाराष्ट्र मोटार वाहन कर कायद्यातील कलम ३(अ) अंतर्गत तरतुदीनुसार प्रथम नोंदणी दिनांकापासून १५ वर्षे पूर्ण झालेल्या परिवहनेतर(खाजगी) वाहनांना तर प्रथम नोंदणी दिनांकापासून ८ वर्षे पूर्ण झालेल्या परिवहन संवर्गातील वाहनांना पर्यावरण कर देय ठरतो.

(अ) दिनांक ३०/११/२०१७ अखेरपर्यंत राज्यामध्ये १५ वर्षे पूर्ण झालेली परिवहनेतर संवर्गातील (खाजगी) वाहनांची संख्या ढोबळ मानाने ६१.२३ लक्ष इतकी आहे.

(ब) तसेच दिनांक ३०/११/२०१७ अखेरपर्यंत राज्यामध्ये ८ वर्षे पूर्ण झालेली परिवहन संवर्गातील वाहनांची संख्या ढोबळ मानाने १२.२७ लक्ष इतकी आहे.

२. सन २०१० पासून दिनांक ३०/०४/२०१८ पर्यंत रुपये ३४९.९८ कोटी एवढा पर्यावरण कर वसूल करण्यात आला असून तो शासनाच्या एकत्रित निधीत जमा होतो.

३. पर्यावरण कराच्या वापरासाठी पर्यावरण कराचा विनियोग हे लेखाशिर्ष उघडण्यात आले आहे. पर्यावरण कराच्या निधी वापरासाठी रुपये १०००/- एवढी नाममात्र तरतूद २०११ पासून करण्यात आली होती. परंतु सदर तरतूद प्रत्येक वर्षी शासनास समर्पित करण्यात आली आहे.

(२) रस्ता सुरक्षा उपकराची आकारणी व वसुली दिनांक २४/१०/२०१६ पासून सुरु करण्यात आली आहे. रस्ता सुरक्षा निधीतून खर्चास मान्यता देण्याचे अधिकार उच्चस्तरीय समितीस असून सदर समितीने एकूण रुपये ४२.०० कोटीच्या खर्चास मान्यता दिली असून तो खर्च करण्याची बाब संबंधित विभागांच्या कार्यवाहीखाली आहे.
(३) व (४) रस्ता सुरक्षा निधीपैकी रुपये २०.०० कोटी इतकी रक्कम जनजागृती, प्रचार व प्रसार यासाठी राखीव ठेवण्यात आली असून त्यानुसार

शासनाच्या माहिती व जनसंपर्क विभागामार्फत प्रसिध्दी माध्यम आराखडा बनविण्याची बाब कार्यवाहीखाली आहे. सदर आराखड्यात शालेय विद्यार्थ्यांमध्ये रस्ता सुरक्षा प्रबोधनाच्या कार्यक्रमांचा समावेश आहे.
(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## कोल्हापूर जिल्हाधिकारी कार्यालयाच्या आस्थापनेवरील रिक्त पदे भरण्याबाबत

**(२४) ३७८०४ (०५-०४-२०१८). श्री.सतेज ऊर्फ बंटी पाटील, श्री.शरद रणपिसे, श्री.अमरनाथ राजूरकर, श्री.आनंदराव पाटील :** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) कोल्हापूर जिल्हाधिकारी कार्यालयाच्या आस्थापनेवरील विविध संवर्गातील ११ टक्के म्हणजे १३७ पदे रिक्त असल्याचे माहे जानेवारी, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, रिक्त पदांमुळे जिल्हाधिकारी कार्यालयातील कामकाजाचा अतिरिक्त कामाचा ताण वाढत असून इतर कर्मचाऱ्यांवर कामांचा तणाव निर्माण होत आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन सदर रिक्त पदे भरण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (२५-०९-२०१८) :** (१) कोल्हापूर जिल्हाधिकारी कार्यालयाच्या आस्थापनेवर एकुण १३१० पदे मंजुर असून जानेवारी, २०१७ मध्ये त्यापैकी ११८० पदे भरलेली आहेत तर १३० पदे रिक्त आहेत.
(२) अंशत: खरे आहे.
(३) जिल्हाधिकारी कार्यालयाच्या आस्थापनेवरील रिक्त असलेल्या पदांपैकी लिपीक (पदोन्नती कोटा) व शिपाई (पदोन्नती कोटा) या संवर्गासाठी पात्र उमेदवार उपलब्ध नसल्याने ४३ पदे रिक्त आहेत. वित्त विभागाच्या दिनांक २५/०५/२०१७ व दिनांक २९/०६/२०१७ च्या शासन निर्णयातील

तरतुदीनुसार प्रशासकीय विभागांनी आकृतिबंध अंतिम करेपर्यंत पदभरती करता येत नाही. महसूल विभागाचा आकृतिबंध अंतिम करण्याची कार्यवाही सुरु आहे.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## सातारा जिल्ह्यातील कोयना धरणग्रस्तांचे पुनर्वसन करण्याबाबत

**(२५) ३८३०६ (०५-०४-२०१८). श्री.आनंदराव पाटील, श्री.शरद रणपिसे, श्री.अमरनाथ राजूरकर, प्रा.जोगेन्द्र कवाडे, श्री.हेमंत टकले, श्री.किरण पावसकर, श्री.अनिल भोसले, ॲड.निरंजन डावखरे, श्रीमती विद्या चव्हाण, ॲड.राहुल नार्वेकर : तारांकित प्रश्न क्रमांक २७५७१ ला दिनांक १० मार्च, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **मदत व पुनर्वसन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) सातारा जिल्ह्यातील कोयना धरणग्रस्तांना व सह्याद्री व्याघ्र प्रकल्पातील प्रकल्पबाधितांचे सुमारे ५८ वर्षापासून पुनर्वसन होत नसल्याने श्रमिक मुक्ती दलाने माहे जानेवारी, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान सातारा जिल्हाधिकारी कार्यालयासमोर आंदोलन केले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, श्रमिक मुक्ती दलाच्या मागण्या कोणत्या आहेत, सदर मागण्यांपैकी शासनाने कोणत्या मागण्या मंजूर करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) असल्यास, कोयना प्रकल्पाकडून शासनाला करोडो रुपयाचे उत्पन्न मिळत असले तरी सातारा जिल्ह्यातील कोयना वसाहतीतील नागरी सुविधांकडे गैरसोय होत असून रस्ते, वीज, पाणी आणि कचऱ्याची विल्हेवाट नसणे तसेच, कोयना धरणातून जनतेला जाण्या-येण्यासाठी लॉंचसेवा नसणे अशा अनेक समस्या असल्याचे निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(४) असल्यास, याबाबत शासनाने चौकशी करुन कोयना वसाहतीतील नागरी सुविधांमध्ये सुधारणा करण्यासाठी कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (१५-०९-२०१८) :** (१) कोयना धरणग्रस्त व सहयाद्री व्याघ्र प्रकल्पातील प्रकल्पबाधितांच्या पुनर्वसना संदर्भातील मागण्यासाठी श्रमिक मुक्ती दलाने सातारा जिल्हाधिकारी कार्यालयासमोर दिनांक २३/०१/२०१८ पासून ते दिनांक २५/०१/२०१८ पर्यंत बेमुदत ठिय्या आंदोलन केले होते.

(२) १) कोयना धरणग्रस्त आणि कोयना अभयारण्याग्रस्त यांच्या विकसनशील पुनर्वसनासाठी सातारा जिल्हाधिकारी कार्यालय आणि मंत्रालय अशा दोन्ही ठिकाणी वॉर रूम सदरात विशेष ऑफिसेस तातडीने सुरु करावीत.

२) कोयना धरणग्रस्ताना २०१३ च्या राष्ट्रीय भूसंपादन पुनर्वसन कायद्याच्या सर्व तरतूदी लागू करुन त्यांचा लाभ देण्याची प्रक्रिया तातडीने सुरु करावी.

३) ६०-६५ वर्षे पुनर्वसन रखडल्यामुळे या प्रकल्पग्रस्तांचे प्रचंड उदध्वस्तीकरण झाले आहे म्हणून त्यांना विशेष बाब सदरात

I. ज्यांना अजिबात जमीन दिली गेली नाही आणि ज्यांना दिलेली जमीन पिकाऊ नाही त्यांना विस्थापित झाल्याच्या काळापासून दरमहा १५०००/- रुपये निर्वाहभत्ता, जमीन मिळेपर्यंत देण्यात यावा.

II. जमीन नापीक असेल तर ती रद्द करुन त्यांना पिकाऊ जमीन देण्यात यावी.

III. कोयना 'शिवसागर जलाशय' पूररेषेपर्यंतची जमीन वगळून उर्वरीत पिकाऊ जमीन आणि वनखात्याकडे वर्ग झाली आहे ती पाण्याने सिंचित करून उर्वरीत धरणग्रस्तांचे पुनर्वसन करण्यात यावे. ज्यांना या परिसरात जमीन दिली आहे त्यांच्या जमिनीलाही सिंचनाची सोय करावी.

IV. ज्या प्रकल्पग्रस्तांना इतर जिल्ह्यामध्ये पिकाऊ जमिनी दिल्या गेल्या असतील त्यांनाही सिंचनाची सुविधा उपलब्ध करुन द्यावी.

V. कोयना जलाशय परिसर अभयारण्याचा कोअर व बफरझोन या सर्व क्षेत्रात पर्यटन उद्योगाचा विकास करण्याचे सर्व नियंत्रण परिसरातील प्रकल्पग्रस्तांकडे द्यावे आणि त्यासाठी वीज भांडवल उपलब्ध करावे.

VI. ९५ टक्क्यांपेक्षा जास्त पाणी कोयनेचे असल्यामुळे त्या क्षेत्रात कायद्याप्रमाणे स्लॅब लावून (कोयना जलाशयाभोवतीची जमीन कमी पडत असेल तर) या लाभ क्षेत्रातातून उपलब्ध करुन घ्यावी.

VII. महावितरण / निर्मिती कंपन्यांना कोयना प्रकल्पामुळे बाधित झालेल्यांना सवलतीने देण्याबाबत आदेश द्यावेत.

VIII. ज्यांच्या जमिनी धरणाची कॉलनी इत्यादीसाठी संपादन झाल्या त्या खातेदारांचे पुनर्वसन करणे.

IX. धरण प्रकल्पग्रस्तांनी ग्रामसभामध्ये बनवलेला विकास आराखडा पर्यावरण विकासासाठी उपयोगात आणण्याचे आणि लोकशाही निर्णय प्रक्रिया राबवण्यासाठीचे ठोस निर्देश देण्यात यावेत.

X. याच परिसरात पर्यावरणवर्धक, स्थानिक निसर्ग संपत्तीवर आधारित, लघु उद्योग निर्माण करण्याबाबत संबंधित व्याघ्र प्रकल्प / अभयारण्य प्रकल्प अधिकाऱ्यांना निर्देश देण्यात यावेत.

XI. शिवसागर जलाशयाच्या भोवतालच्या परिसरातील जमिनी पर्यायी जमिनी म्हणून वाटण्यात आल्या त्या परस्परच वनखात्याकडे वर्ग केल्या त्यात तातडीने दुरुस्ती करावी.

XII. धरणग्रस्तांच्या सर्व वसाहतींना तातडीने अधिकृत वसाहती घोषित करण्यात यावे.

XIII. कोयना प्रकल्पग्रस्तांच्या जमिनींना सिंचित करणासाठी तसेच त्यांना घरगुती वापरासाठी वीज मोफत देण्यात यावी.

XIV. खाजगी आणि सहकारी कारखान्यांमध्ये पात्र प्रकल्पग्रस्ताच्या घरातील दोन व्यक्तींना कायमस्वरुपी नोकरी देण्याचे आदेश व्हावेत.

१) वरील मागण्यांच्या अनुषंगाने जिल्हाधिकारी यांचे स्तरावरच्या मागण्यांबाबत दिनांक २५/०१/२०१८ रोजी जिल्हाधिकारी कार्यालय, सातारा येथे श्रमिक मुक्ती दलाच्या प्रतिनिधींसोबत बैठक घेण्यात आली.

२) शासनस्तरावरील मागण्यांबाबत दिनांक १९/०३/२०१८ रोजी मुख्यमंत्री यांचे अध्यक्षतेखाली श्रमिक मुक्ती दलाच्या प्रतिनिधींसोबत बैठकीत पार पडली असून सदर बैठकीत प्रकल्पग्रस्तांच्या मागण्यावर प्रचलीत नियमानुसार योग्य ती कार्यवाही करण्याबाबत संबंधितांना निर्देश देण्यात आले.

(३) बहुतांशी नागरी सुविधांची कामे पूर्ण करण्यात आली असून उर्वरित नागरी सुविधांची कामे प्रगतीपथावर आहेत.

(४) कार्यकारी अभियंता यांच्यामार्फत उर्वरित नागरी सुविधांची अंदाजपत्रके बनविण्याचे काम प्रगतीपथावर आहे.
(५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## कंधार (जि.नांदेड) तालुक्यातील गांवे पाणंदमुक्त करण्याबाबत

**(२६) ३८५५३ (०५-०४-२०१८). श्री.अमरनाथ राजूरकर, श्री.शरद रणपिसे :** सन्माननीय **पाणीपुरवठा व स्वच्छता मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) कंधार (जि.नांदेड) तालुक्यातील पाणंदमुक्ती अपुऱ्या निधीमुळे प्रलंबित असल्याचे दिनांक २८ डिसेंबर, २०१७ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, अपुऱ्या निधीमुळे येथील ६५ गांवे पाणंदमुक्त होण्यासाठी प्रक्रियेत आहेत, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन सदर प्रक्रियेत असलेली गांवे पाणंदमुक्त होण्यासाठी निधी उपलब्ध करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.बबनराव लोणीकर (१३-११-२०१८) :** (१) होय, हे खरे आहे.
(२) सदर ६५ गावांसह संपूर्ण कंधार तालुका हागणदारीमुक्त झालेला आहे.
(३) शासन निर्देशानुसार स्वच्छ भारत मिशन अंतर्गत वैयक्तिक शौचालय बांधकामासाठी ग्राम पंचायतीकडे उपलब्ध असलेला निधी व शासन स्तरावरुन प्राप्त झालेल्या निधीच्या माध्यमातून पायाभूत सर्वेक्षण २०१२ नुसार एकूण ११६ ग्राम पंचायतीसह कंधार तालुका हागणदारीमुक्त झाला आहे.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## लुईस बर्जर या कंपनीला वर्सोवा-वांद्रे सिलिंक प्रकल्पाच्या निविदा न देण्याबाबत

**(२७) ३८५९० (०५-०४-२०१८). प्रा.जोगेन्द्र कवाडे, श्री.जगन्नाथ शिंदे, श्री.धनंजय मुंडे, ॲड.राहुल नार्वेकर, ॲड.निरंजन डावखरे, श्री.शरद रणपिसे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.आनंदराव पाटील, श्री.रामहरी रुपनवर, ॲड.हुस्नबानू खलिफे, डॉ.सुधीर तांबे, श्री.हरिसिंग राठोड, श्री.सुभाष झांबड, श्री.अमरनाथ राजूरकर, श्री.जयंत पाटील :** सन्माननीय **सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम वगळून) मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) कंत्राटे मिळविण्याकरीता उच्चपदस्थ अधिकारी व लोकप्रतिनिधींना मोठ्या रक्कमेची लाच दिल्याचा दावा करणाऱ्या लुईस बर्जर या कंपनीची महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळाने वर्सोवा-वांद्रे सिलिंक प्रकल्पासाठी व्यवस्थापन सेवा पुरविण्याकरीता नियुक्ती केली असल्याची बाब माहे जानेवारी, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, ही कंपनी तीन टप्प्यात सेवा पुरवणार असून पहिल्या टप्प्यातून पूर्वी तयार केलेला आर्थिक व्यवहार्यता आणि विस्तृत प्रकल्प अहवाल यानुसार काम, दुसऱ्या टप्प्यात प्रकल्पाचे इंजिनिअर्स, खरेदी आदी अन्य कामांसाठी निविदा दस्ताऐवजांचे एकत्रिकरण तर तिसऱ्या टप्प्यात प्रकल्प बांधकामावर देखरेख आदी कामांचा समावेश असलेले रुपय १०९ कोटींचे कंत्राट देण्यात आले आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, या कंत्राटाकरीता एकूण किती कंपन्यांनी निविदा भरल्या होत्या व त्यापैकी किती कंपन्या निविदा प्रक्रियेकरीता पात्र होत्या,

(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने लोकप्रतिनिधी व उच्चपदस्थ अधिकाऱ्यांवर आक्षेपार्ह दावा करणाऱ्या कंपनीला निविदा प्रक्रियेपासून दूर ठेवण्याबाबत कोणती कार्यवाही केली होती,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (०३-११-२०१८) :** (१) अंशत: खरे आहे.

मे.लुईस बर्जर या कंपनीस महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळाने वर्सोवा वांद्रे सागरी सेतु प्रकल्पाकरीता सल्लागार म्हणून नेमणूक दिनांक १८/०७/२०१७ रोजी केली आहे.

(२) होय, हे खरे आहे.

(३) या कंत्राटासाठी दोन कंपन्यांकडून निविदा प्राप्त झाल्या होत्या व या दोन्ही कंपन्या निविदा प्रक्रियेकरीता प्रात्र होत्या.

(४) निविदा प्रक्रिया पार पाडून प्रश्नाधीन कंपनीची निवड करण्यात आली असल्यामुळे चौकशी करण्याचा प्रश्न उद्‌भवत नाही.

(५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## तत्कालीन सहाय्यक आयुक्त मत्स्यव्यवसाय, उस्मानाबाद यांच्या विभागीय चौकशीबाबत

**(२८) ३९१७३ (०५-०४-२०१८). श्री.रामराव वडकुते :** सन्माननीय **मत्स्यविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) तत्कालीन प्रादेशिक उपायुक्त मत्स्यव्यवसाय, लातूर यांनी सन २०१५ मध्ये तत्कालीन सहाय्यक आयुक्त मत्स्यव्यवसाय, उस्मानाबाद यांच्याविषयी आलेल्या तक्रारीच्या अनुषंगाने त्यांची विभागीय चौकशी करण्यात येत आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.महादेव जानकर (०५-११-२०१८) :** (१) हे खरे नाही.

(२) प्रश्न उद्‌भवत नाही.

(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## सौर आणि पवन ऊर्जा निर्मितीसाठी महावितरणने केलेल्या कराराबाबत

**(२९) ३९५६० (०५-०४-२०१८). श्री.शरद रणपिसे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.आनंदराव पाटील, श्री.रामहरी रुपनवर, ॲड.हुस्नबानू खलिफे, श्री.अमरनाथ राजूरकर, श्री.जनार्दन चांदूरकर, डॉ.सुधीर तांबे, श्री.हरिसिंग राठोड, श्री.सुभाष झांबड, श्री.सतेज ऊर्फ बंटी पाटील, श्री.मोहनराव कदम :** सन्माननीय **नवीन व नवीकरणीय ऊर्जा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात स्वच्छ ऊर्जेच्या पर्यायाचा स्वीकार करत महावितरण सौर आणि पवन ऊर्जेद्वारे १५०० मेगावॅट वीज निर्मिती करुन सदर वीज खरेदी प्रक्रियेसाठी करार करणार आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रक्रिया पूर्ण करुन करार करण्यात आले आहेत काय, त्याचे स्वरुप काय आहे व त्यानुसार शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे?

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रशेखर बावनकुळे (१७-११-२०१८) :** (१) होय, हे खरे आहे.

(२) महावितरण कंपनीने माहे जुलै, २०१७ पासून (पालिकेतील घन कचऱ्यापासून निर्मित होणाऱ्या वीजेव्यतिरिक्त) नवीन व नवीकरणीय ऊर्जा, स्पर्धात्मक निविदा प्रक्रिये अंतर्गत खरेदी करण्याचा निर्णय घेतला आहे. सन २०१७-१८ मध्ये महावितरण कंपनीने स्पर्धात्मक निविदा प्रक्रियेव्दारे निविदेत यशस्वी झालेल्या पवन ऊर्जा प्रकल्प धारकांकडून ५०० मेगावॅट आणि सौर ऊर्जा प्रकल्प धारकांकडून १००० मेगावॅट असे एकूण १५०० मेगावॅट क्षमतेचे वीज खरेदी करार केले आहेत.

(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## आदिवासी आश्रमशाळांमधील शिक्षकांना नियमित वेतन मिळण्याबाबत

**(३०) ४००६६ (०३-०४-२०१८). श्री.दत्तात्रय सावंत, श्री.श्रीकांत देशपांडे, श्री.बाळाराम पाटील :** सन्माननीय **आदिवासी विकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) आदिवासी विभागातील मुलांच्या शिक्षणासाठी आदिवासी भागात शासन व स्वयंसेवी संस्था यांच्यामार्फत स्थापन केलेल्या आश्रमशाळांमध्ये मुलांच्या संख्येत वाढ झाली असल्याचे निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, शालेय शिक्षण विभागाच्या अंतर्गत कार्यरत असणाऱ्या शिक्षकांचे वेतन प्रत्येक महिन्याच्या १ तारखेला देण्याचा निर्गमित केलेला शासन निर्णय आदिवासी आश्रमशाळांमधील शिक्षकांना लागू करण्याची मागणी संबंधित शिक्षक व लोकप्रतिनिधी यांच्याकडून करण्यात येत आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहे ?

**श्री.विष्णु सवरा (१७-११-२०१८) :** (१) व (२) हे खरे आहे.
(३) आदिवासी विकास विभागाच्या अंतर्गत अनुदानित आश्रमशाळांमधील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांचे वेतन पुढील महिन्यात १ तारखेस अदा होण्याबाबत दिनांक २३/११/२०१५ रोजी शासन निर्णय निर्गमित केला आहे.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## अमळनेर (जि.जळगाव) येथील पोलीस स्टेशनच्या आवारातील वाळू चोरीतील जप्त वाहनांबाबत

**(३१) ४०३३५ (०६-०४-२०१८). श्रीमती स्मिता वाघ :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) अमळनेर (जि.जळगाव) येथील पोलीस स्टेशनच्या आवारात तहसिलदार, अमळनेर यांच्या अन्वये वाळू चोरीतील ५० पेक्षा अधिक वाहने गेल्या २ वर्षापेक्षा अधिक कालावधीपासून जप्त करून ठेवले असल्याची बाब निदर्शनास आली आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, अशा प्रकारे वाहने जप्त करण्याचा व त्यांचा लिलाव करण्याचा अधिकार पोलीस विभागाला आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त जप्त करण्यात आलेली वाहने व वाहनातील गौण खनिजाचा लिलाव करण्याची प्रक्रिया राबविण्यात आली आहे काय,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०५-११-२०१८) :** (१) तहसिलदार अमळनेर (जि.जळगाव) यांनी वाळू चोरी संदर्भात केलेल्या कारवाईत माहे मार्च, २०१७ ते दिनांक ३१ मार्च, २०१८ या कालावधीत जप्त केलेली एकूण ३९ वाहने अमळनेर पोलीस स्टेशन आवारात लावलेली आहेत.
(२) अवैध गौण खनिज वाहतुक प्रकरणी महसूल विभागाने जप्त करण्यात आलेली वाहने लिलाव करण्याचा अधिकार पोलीस विभागास नाही.
(३) दिनांक ०४/१०/२०१८ रोजी लिलावाची प्रक्रिया तहसिल कार्यालय, अमळनेर यांचेकडून राबविण्यात आलेली होती. परंतु, सदर लिलावात कुणीही भाग घेतलेला नव्हता. त्यामुळे जप्त करण्यात आलेल्या वाहन मालकांचे इतर मालमत्तेचा शोध घेऊन त्यावर अवैध गौण खनिज वाहतूक प्रकरणी केलेल्या दंडाचे रकमेचा बोजा लावण्याची कार्यवाही सुरु आहे.
(४) विलंब झालेला नाही.

---

## घरेलु कामगार कल्याण मंडळ अधिनियम, २०१८ मध्ये केंद्र शासनाच्या मसुदयाप्रमाणे सुधारणा करण्याबाबत

**(३२) ४०८५१ (०६-०४-२०१८). श्री.अमरनाथ राजूरकर :** सन्माननीय **कामगार मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) केंद्र शासनाने दिनांक २० ऑक्टोबर, २०१७ रोजी वा त्यासुमारास घरेलु कामगारांकरीता राष्ट्रीय धोरणाचा मसुदा तयार केला आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, घरेलु कामगार कल्याण मंडळ अधिनियम २०१८ मध्ये केंद्र शासनाच्या मसुद्याप्रमाणे सुधारणा करण्याबाबत व धोरणातील शिफारस केलेल्या तरतूदींची पूर्तता करण्यासंदर्भात शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.संभाजी पाटील-निलंगेकर (०२-११-२०१८) :** (१) हे खरे आहे.
(२) दिनांक १०/१०/२०१७ रोजी केंद्र शासनाने घरेलु कामगारांच्याबाबतीत प्रसिध्द केलेल्या राष्ट्रीय धोरणांचा मसुदा केंद्र शासनामार्फत अंतिम झाल्यानंतर त्यानुसार पुढील शासनस्तरावरुन कार्यवाही करण्यात येईल.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## अमरावती-सुरत या महामार्गाचे चौपदरीकरणाचे काम करण्याबाबत

**(३३) ४१६२४ (०२-०८-२०१८). श्री.गोपिकिशन बाजोरीया : तारांकित प्रश्न क्रमांक ३४००६ ला दिनांक ३१ जुलै, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम वगळून) मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) अमरावती-सुरत या महामार्गाच्या चौपदरीकरणाचे कामाची मुदत कारारनाम्यानुसार सन २०१९ पर्यंतच असतांनाही चौपदरीकरणाचे काम अत्यंत संथगतीने सुरु असून सद्य:स्थितीमध्ये २० ते २५ टक्के काम पूर्ण झाले असल्याचे माहे एप्रिल, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने महामार्ग चौपदरीकरणाचे काम सन २०१९ पर्यंत पूर्ण होण्याच्यादृष्टीने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (२६-१०-२०१८) :** (१) व (२) अंशत: हे खरे आहे.

अमरावती-सुरत या राष्ट्रीय महामार्ग क्र. ५३ च्या चौपदरीकरणापैकी सुरत-हाजिरा (पोर्ट सेक्शन) ते गुजरात महाराष्ट्र बॉर्डरचे भारतीय राष्ट्रीय राजमार्ग प्राधिकरण, सुरत यांचे कार्यक्षेत्रातील काम भौतिकदृष्टया पूर्ण झाले असल्याचे प्रकल्प संचालक, भारतीय राष्ट्रीय राजमार्ग प्राधिकरण, सुरत यांनी कळविले आहे.

तसेच सदर राष्ट्रीय महामार्ग क्र. ५३ च्या अमरावती ते चिखली पर्यंतच्या किमी १६६/०० ते ३६०/०० रस्त्याच्या चौपदरीकरणाचे काम

डीबीएफओटी तत्वावर भारतीय राष्ट्रीय राजमार्ग प्राधिकरण, अमरावती यांचेतर्फे सुरु आहे. सद्य:स्थितीत सदर कामाकरीता ९८.९१ टक्के जमिनीचे संपादन झालेले असून रस्त्याच्या चौपदरीकरणाचे सुमारे २५ टक्के काम पूर्ण झाले असल्याचे प्रकल्प संचालक, भारतीय राष्ट्रीय राजमार्ग प्राधिकरण, अमरावती यांनी कळविले आहे. याशिवाय प्रस्तुत रस्त्याच्या चौपदरीकरण करण्याच्या फागणे ते गुजरात महाराष्ट्र सीमेपर्यंतच्या किमी ५१०/०० ते किमी ६५०/७९४ मधिल काम डीबीएफओटी तत्वावर प्रकल्प संचालक, भारतीय राष्ट्रीय राजमार्ग प्राधिकरण, धुळे यांचेकडू सुरु असून सद्य:स्थितीत सदर कामाकरीता ९५.१८ टक्के जमिनीचे संपादन होऊन सदर १४०/७९४ किमी पैकी ९० किमी चे काम (सुमारे ६४ टक्के) पूर्ण झाल्याचे प्रकल्प संचालक, भारतीय राष्ट्रीय राजमार्ग प्राधिकरण, धुळे यांनी कळविले आहे.

(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## सागरी सुरक्षारक्षकांचे थकीत मानधन देण्याबाबत

**(३४) ४१९७४ (०२-०८-२०१८). श्री.रामहरी रुपनवर, श्री.शरद रणपिसे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.आनंदराव पाटील, ॲड.हुस्नबानू खलिफे, डॉ.सुधीर तांबे, श्री.सुभाष झांबड, श्री.अमरनाथ राजूरकर : तारांकित प्रश्न क्रमांक ३७९९८ ला दिनांक २२ मार्च, २०१८ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **मत्स्यविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील सागरी सुरक्षारक्षकांच्या मानधनासाठी निधी अपुरा पडत असल्यामुळे सहा महिन्यांपासून सुरक्षारक्षकांचे मानधन थकित असल्याचे दिनांक १४ एप्रिल, २०१८ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सुरक्षारक्षकांच्या मानधनासाठी रुपये ५ कोटी ८८ लाखाची तरतूद करण्यास वित्त विभागाने मान्यता दिली आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन सागरी सुरक्षारक्षकाचे थकित मानधन देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.महादेव जानकर (०९-१०-२०१८) :** (१) हे खरे आहे.
(२) सन २०१८-१९ करीता रुपये ५.०० कोटी इतका अर्थसंकल्पीत निधी मंजूर करण्यात आला आहे.
(३) सन २०१८-१९ मध्ये अर्थसंकल्पीत करण्यात आलेला रुपये ५००.०० लक्ष निधीपैकी रुपये ३५०.०० लक्ष इतका निधी शासनाने दिनांक ०२ एप्रिल, २०१८ रोजी वितरीत केला होता.

तसेच सन २०१८-१९ च्या अर्थसंकल्पीत निधीमधील अखर्चित राहिलेला रुपये १५०.०० लक्ष इतका निधी व जुलै, २०१८ च्या पावसाळी अधिवेशनात पुरवणी मागणीद्वारे मंजुर झालेला रुपये ३६८.४२ लक्ष असा एकूण रुपये ५१८.४२ लक्ष इतका निधी शासनाच्या दिनांक २८/०८/२०१८ रोजीच्या ज्ञापनान्वये सागरी सुरक्षा रक्षक व पर्यवेक्षक यांचे सप्टेंबर महिन्यापर्यंतचे वेतन व मानधन अदा करण्यासाठी वितरीत करण्यात आलेला आहे.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यातील घरेलू कामगारांना राष्ट्रीय मसुद्याप्रमाणे हक्क, अधिकार तसेच सामाजिक संरक्षण मिळण्याबाबत

**(३५) ४२२७१ (०२-०८-२०१८). श्री.आनंदराव पाटील, श्री.रामहरी रुपनवर, ॲड.हुस्नबानू खलिफे :** सन्माननीय **कामगार मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) केंद्र शासनाने मंजूर केलेल्या घरेलू कामगारांच्या राष्ट्रीय मसुद्याप्रमाणे शासनाने घरेलू कामगारांना हक्क, अधिकार देवून किमान सामाजिक संरक्षण देण्यात यावे या मागण्यासाठी पुणे शहर मोलकरीण संघटनेने कामगारांच्या स्वाक्षऱ्यांचे निवेदन संबंधित मा.पुणे जिल्हा पालकमंत्री यांचेकडे सादर केल्याचे दिनांक ७ एप्रिल, २०१८ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.संभाजी पाटील-निलंगेकर (०२-११-२०१८) :** (१) हे खरे आहे.

(२) दिनांक १०/१०/२०१७ रोजी केंद्र सरकारने घरेलु कामगारांच्या बाबत प्रसिद्ध केलेल्या राष्ट्रीय धोरणांच्या मसुद्यावर केंद्र शासनाचा अंतिम निर्णय झालेला नाही.

दिनांक २७/३/२०१५ रोजीच्या अधिसुचनेद्वारे विकास आयुक्त (अ.का) कामगार यांची एक सदस्य मंडळ या नात्याने नियुक्ती झालेली आहे.

घरेलु कामगारांसाठी खालील लाभ देण्यात येत आहेत ;-

१) मृत घरेलु कामगारांच्या कायदेशीर वारसांस अंत्यविधी सहाय्य रुपये २०००

२) घरेलु कामगारांस २ अपत्य पर्यंत प्रत्येक प्रसूतीकरीता रुपये ५००० इतकी मदत देण्यात येत आहे.

३) दिनांक ३१/७/२०१४ पर्यंत ज्या नोंदीत घरेलु कामगारांनी वयाची ५५ वर्ष पूर्ण झालेली.

४) अशा नोंदीत घरेलु कामगारांना सन्मानधन योजनेंतर्गत प्रत्येकी रुपये १०००० आमआदमी विमा योजनेंतर्गत देण्यात येणारे लाभ :-

  १) लाभार्थीचा नैसर्गिक मुत्यू ओढवल्यास त्यांच्या वारसांस रुपये ३००००

  २) लाभार्थीचा अपघाती मुत्यू ओढवल्यास त्यांच्या वारसास रुपये ७५०००

  ३) लाभार्थीस अपघातमुळे कायम स्वरुपी संपूर्ण अपंगत्व आढलल्यास त्यास रुपये ७५०००

  ४) लाभार्थीस अंशत: अपंगत्व आल्यास त्यास रुपये ३७५००

लाभार्थीच्या मुलींच्या शिक्षणाकरीता शिक्षा सहयोग योजनांतर्गत इयत्ता ९ ते १२ करीता आय.टी.आय कोर्स करीत असल्यास व दर वर्षी उत्तीर्ण असल्यास पाल्यांस दर तिमाही रुपये ३०० इतकी रक्कम प्रत्येकी दिली जाते.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

## मुंबईतील मढ बेटावरील कोळीवाड्यातील मासळी सुकवण्यावर बंदी घातल्याबाबत

**(३६) ४२३२७ (०२-०८-२०१८). श्री.प्रविण दरेकर :** सन्माननीय **मत्स्यविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मुंबईतील मढ बेटावरील कोळीवाड्याच्या शेजारच्या परिसरातील रहिवाश्यांना माशांची दुर्गधी येत असल्याने कोळीवाड्यातील मासळी सुकवण्यावर बंदी घालण्याची मागणी तेथील रहिवाशांनी केली असल्याचे माहे एप्रिल, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, कोळी बांधवांवर अशाप्रकारे अन्याय करण्यात येत असल्यामुळे मुळ नागरिकांवर अन्याय होऊ नये म्हणून शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.महादेव जानकर (१७-०९-२०१८) :** (१) हे खरे नाही.

(२) व (३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यातील पुनर्वसित व्यक्तींना दिल्या जाणाऱ्या सवलती निर्बंधमुक्त करण्याबाबत

**(३७) ४२३३० (०२-०८-२०१८). श्री.प्रविण दरेकर :** सन्माननीय **मदत व पुनर्वसन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील विविध प्रकल्पातील पुनर्वसित व्यक्तीना दिल्या जाणाऱ्या सवलती निर्बंधमुक्त असाव्यात, प्रकल्पग्रस्तांना दिल्या जाणाऱ्या जमिनीना वर्ग एकचा दर्जा देऊन याबाबत कार्यवाही करण्याचे निर्देश मा.मुख्यमंत्री यांनी माहे मे, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान जनता दरबारात दिले होते, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, मा.मुख्यमंत्री यांनी निर्देश देऊनही कोणतीच कार्यवाही झाली नाही, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (१७-०९-२०१८) :** (१) महारष्ट्र प्रकल्पबाधित व्यक्तींचे पुनर्वसन अधिनियम १९९९ मधील कलम १६(१)(ब) नुसार केवळ पाट्बंधारे प्रकल्पांमूळे बाधित झालेल्या प्रकल्पग्रस्त व्यक्तींना पुनर्वसित गावठाणामध्ये घरे बांधण्यासाठी त्यांनी पुर्वी धारण केलेल्या जमिनीच्या भोगवटा स्थितीसह नवीन गावठाणामध्ये दिल्या जाणाऱ्या भुखंडांना वर्ग एकचा दर्जा देण्याबाबत कार्यवाही करण्याचे निर्देश मा.मुख्यमंत्री यांनी माहे मे, २०१८ मध्ये आयोजित लोकशाही दिनामध्ये दिले होते.
(२), (३) व (४) पाटबंधारे प्रकल्पामुळे/भुसंपादनामुळे विस्थापित झालेल्या बाधित व्यक्तीस पुनर्वसित गावठाणामध्ये भोगवटादार वर्ग-२ म्हणुन वाटप झालेल्या भुखंडाचे भोगवटादार वर्ग-१ मध्ये रुपांतर करण्याबाबत व सदर भुखंडाच्या हस्तांतरण व्यवहारावर असलेले निर्बंध उठविण्याबाबत मा.मुख्यमंत्री महोदय यांनी निर्देश दिले असून त्यानुसार शासन निर्णय क्रमांक आरपीए-२०१८/प्र.क्र.१५७/र-१, दि १८/५/२०१८ निर्गमित करण्यात आला आहे.

---

## मौजे कविलगाव (नेरुर) (ता.कुडाळ, जि.सिंधुदूर्ग) येथील जागेची नकाशा नियमाप्रमाणे मोजणी करण्याबाबत

**(३८) ४२६८३ (०२-०८-२०१८). श्री.सुभाष झांबड : तारांकित प्रश्न क्रमांक ३७३७२ ला दिनांक १९ डिसेंबर, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मौजे कविलगाव (नेरुर) (ता.कुडाळ, जि.सिंधुदुर्ग) येथील सर्व्हे नं. ३१, हिस्सा नं. १२-अ व १३ च्या लगत धारक स.नं. ३१, हिस्सा नं. ११/९६ ची हद्द कायम मान्य नसल्याने श्री.म्हाडदळकर यांनी जिल्हाधिकारी व उप अधीक्षक, भूमि अभिलेख, कुडाळ यांचेकडे तक्रार केली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, श्री.म्हाडदळकर यांचे स.नं. १, हि.नं. १२-अ व १३ ची मोजणी मूळ अभिलेखाचा आधार घेवून कायम केली असल्याने ती बरोबर आहे तसेच लगत श्री.पटोदिया यांचे स.नं. ३१, हिस्सा नं. ११/९६ ची मोजणी रेखांकन नकाशा आधारे केली असल्याने ती सदोष असल्याचे निदर्शनास आले, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त मोजणी नकाशा नियमाप्रमाणे दुरुस्त करुन सुधारित मोजणी नकाशे पुरविण्याची कार्यवाही करण्याच्या सूचना जमाबंदी आयुक्त, पुणे यांनी जिल्हा अधीक्षक, भूमी अभिलेख, सिंधुदुर्ग यांना दिनांक ७ डिसेंबर, २०१७ रोजी वा त्यासुमारास दिली, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन उक्त जागेची मोजणी नकाशा नियमाप्रमाणे दुरुस्त करण्याबाबत कार्यवाही करुन रेखांकन नकाशाचे आधारे मोजणी करण्याऱ्यांवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे.

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (१७-११-२०१८) :** (१) होय, मौजे कविलगांव, ता.कुडाळ, जि.सिंधुदुर्ग येथील स.नं. ३१, हि.नं. ११/९६ ची मोजणी मान्य नसलेने श्री.सुरेश सदाशिव म्हाडदळकर यांनी दिनांक ०१/०४/२०१७ रोजी जिल्हाधिकारी, सिंधुदुर्ग यांचेकडे व दिनांक ०८/१२/२०१६ रोजी उपअधीक्षक, भूमि अभिलेख, कुडाळ यांचेकडे तक्रारी अर्ज सादर केले आहेत.

(२) होय, मौजे कविलगांव (नेरुर), ता.कुडाळ, जि.सिंधुदुर्ग येथील स.नं. ३१, हि.नं. १२-अ व १३ ची हद्दकायम मोजणी करण्यासाठी उपअधीक्षक, भूमि अभिलेख, कुडाळ यांचेकडे श्री.सुरेश सदाशिव म्हाडदळकर यांनी दिनांक १९/०१/२०१६ रोजी अर्ज केला होता त्यानुसार अ.ता.ह.का.मो.र.नं. २९५३ व २९५४/१६ अन्वये दिनांक १६/०३/२०१६ रोजी मोजणी नकाशाची "क" प्रत दिनांक २३/०३/२०१६ व दिनांक २६/०३/२०१६ रोजी पुरविणेत आली आहे. सदर मोजणी कामाची तपासणी केली असता ती अभिलेखाप्रमाणे असल्याचे आढळून आले.

त्यानंतर श्री.अनिल चौथमल पटोदिया तर्फे कु.मु.धारक श्री.चंद्रकांत दत्तात्रय पाटील यांनी मौजे कविलगांव (नेरूर) येथील स.न. ३१, हि.नं. ११/९६

ची मंजूर रेखंकनाप्रमाणे मोजणी करणेसाठी दिनांक १४/१०/२०१६ रोजी अर्ज केला होता. त्यानुसार अ.ता.ह.का.मो.र.नं. ३१०२/२०१६ अन्वये दिनांक १९/११/२०१६ रोजी मोजणी करून दिनांक २५/११/२०१६ रोजी हद्दी कायम करणेत आल्या आहेत. तपासणीअंती सदरचा नकाशा सदोष असल्याचे निदर्शनास आले आहे.

(३) होय, सदर प्रकरणामध्ये जमाबंदी आयुक्त कार्यालयाकडून दिनांक ०७/१२/२०१७ च्या पत्रान्वये स.नं. ३१, हि.नं. ११/९६ च्या मोजणी नकाशामध्ये आवश्यक ती दुरूस्ती करून दुरूस्ती नकाशा संबंधितांना पुरविण्याबाबत निर्देश जिल्हा अधीक्षक, भूमि अभिलेख, सिंधुदूर्ग यांना देण्यात आले असल्याबाबत शासनास अहवाल सादर केला आहे. स.नं. ३१, हि.नं. ११/९६ च्या मोजणी नकाशामध्ये आवश्यक ती दुरूस्ती करणेबाबत महाराष्ट्र जमीन महसूल अधिनियम, १९६६ कलम २५८ अन्वये जिल्हा अधीक्षक, भूमि अभिलेख, सिंधुदुर्ग यांनी दिनांक २३/०८/२०१८ रोजी आदेश दिलेला आहे. त्यानुसार उपअधीक्षक, भूमि अभिलेख, कुडाळ यांनी कार्यवाही सूरू केली आहे.

(४) मौजे कविलगाव, ता.कुडाळ येथील स.नं. ३१, हि.नं. ११ चे मोजणी नकाशामध्ये मूळ अभिलेखाप्रमाणे दुरूस्ती करण्याबाबत उपअधीक्षक, भूमिअभिलेख, कुडाळ यांना दिनांक २३/०८/२०१८ रोजी पुनर्विलोकन आदेश देण्यात आले आहेत. त्यानुसार सुनावणी घेवून उपअधीक्षक, भूमि अभिलेख, कुडाळ यांनी दिनांक १८/०९/२०१८ रोजी दुरूस्तीबाबत आदेश पारीत केले आहेत. तसेच प्रस्तावित मोजणी बाबत दोषी कर्मचारी श्री.एच.एम.शेख, प्र.लिपीक, उपअधीक्षक, भूमि अभिलेख, कुडाळ यांच्यावर जिल्हा अधीक्षक, भूमि अभिलेख, सिंधुदुर्ग यांच्याकडून दिनांक १९/०९/२०१८ च्या ज्ञापनान्वये महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपिल) नियम, १९७९ मधील नियम १० अन्वये शिस्तभंगविषयक कारवाई सुरू करण्यात आली आहे.

(५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## टेंभुर्णी-लातूर-नांदेड रस्त्यांच्या चौपदरीकरणाबाबत

**(३९) ४३१०० (०२-०८-२०१८). श्री.विक्रम काळे, श्री.सतिश चव्हाण, श्री.दत्तात्रय सावंत : तारांकित प्रश्न क्रमांक ३८१४५ ला दिनांक १ मार्च, २०१८ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम वगळून) मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) सोलापूर-मुंबई मुख्य मार्गापासून टेंभुर्णी ते लातूर व लातूर ते नांदेड या रस्त्यांच्या चौपदरीकरण कामास शासनाने मंजूरी दिली आहे काय,

(२) असल्यास, मंजूरी दिलेल्या कामाचे स्वरुप काय आहे,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (१७-११-२०१८) :** (१) व (२) टेंभुर्णी ते लातूर हा रस्ता केंद्र शासनाने नवीन राष्ट्रीय महामार्ग घोषित केला असून या रस्त्याच्या दोन पदरी करण्याचा प्रकल्प अहवाल केंद्र शासनाकडे मंजुरीसाठी पाठविण्यात आला आहे. तसेच सदर काम सन २०१८-१९ च्या आराखड्यात समाविष्ट होण्यासाठी केंद्रशासनास प्रस्ताव सादर करण्यात आला आहे. केंद्र शासनाच्या तांत्रिक व प्रशासकीय मंजूरी नंतर सदर काम हाती घेण्यात येईल

तसेच लातूर ते नांदेड या रस्त्याच्या चौपदरीकरणाचे कामास केंद्र शासनाने मंजूरी दिली असून सदरील तुळजापूर लातूर-नांदेड हा NH ३६१ चा भाग असून सदरील NH ३६१ चे चौपदरीकरणाचे काम केंद्र शासनाच्या भारतीय राष्ट्रीय राजमार्ग प्राधिकरणामार्फत प्रगतीपथावर आहे. लातूर ते नांदेड हा रस्ता तीन विभागामध्ये विभाजीत करण्यात आलेला असून यामध्ये अष्टीमोड, ता.चाकूर जि.लातूर व माळेगाव ता.लोहा, जि.नांदेड या ठिकाणी पथकर नाका बांधण्याचे योजीले असल्याचे भारतीय राष्ट्रीय राजमार्ग प्राधिकरण, नांदेड यांनी कळविले आहे.

(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## मोहोळ (जि.सोलापूर) तालुक्यातील रिक्त पदे भरण्याबाबत

**(४०) ४३२२९ (०२-०८-२०१८). श्री.दत्तात्रय सावंत, श्री.बाळाराम पाटील, श्री.श्रीकांत देशपांडे :** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मोहोळ (जि.सोलापूर) तालुक्यातील तहसिलदार, तालुका कृषी अधिकारी, उपअधीक्षक भूमी अभिलेख इ. पदे रिक्त असून सदर पदांचा प्रभारी कार्यभार देण्यात आलेला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर प्रभारी कार्यभार दिल्यामुळे मोहोळ तालुक्याच्या विकासाबाबत महत्वाचे निर्णय घेण्यात विलंब होत असल्याने याबाबत स्थानिक नागरीकांनी नाराजी व्यक्त केली आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, मोहोळ तालुक्यात महत्वाच्या पदावर तहसिलदार, तालुका कृषी अधिकारी, उपअधीक्षक, भूमीअभिलेख ही पदे कायम स्वरूपी देणेबाबत मागणी केली आहे, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन मोहोळ तालुक्यास उक्त पदे कायमस्वरूपी देणेबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (२४-१०-२०१८) :** (१), (२), (३) व (४) प्रश्नाधीन पदे रिक्त असतांना सदर पदांचा अतिरिक्त कार्यभार अन्य अधिकाऱ्यांना देण्यात आला होता.तथापि, तहसिलदार, मोहोळ व तालुका कृषी अधिकारी, मोहोळ ही पदे भरण्यात आली आहेत.

उपअधीक्षक भूमी अभिलेख, मोहोळ हे पद पदोन्नती/बदलीने भरण्याचे संकल्पित आहे.

(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## कयाधू नदी (जि.हिंगोली) पुलावरुन अवैधरित्या गौण खनिज वाहतुक करणाऱ्यावर कारवाई करण्याबाबत

**(४१) ४३२५२ (०२-०८-२०१८). श्री.रामराव वडकुते :** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) हिंगोली येथे अवैध गौण खनिज विरोधी पथकाने कयाधू नदी पुलावर दिनांक ५ एप्रिल, २०१८ रोजी वा त्यासुमारास अवैधरित्या गौणखनिज वाहतुक करणारी दोन वाहने पकडली, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने दोषींवर कोणती दंडात्मक कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (२६-१०-२०१८) :** (१) व (२) हिंगोली येथील कयाधू नदीच्या पुलावर दिनांक ५/४/२०१८ रोजी तहसिल कार्यालय, हिंगोली येथील पथकाने गौण खनिजाची अवैध वाहतूक करणारी २ वाहने पकडली असून सदर वाहने हिंगोली शहर पोलीस ठाणे येथे जमा केली आहेत. सदर दोन्ही वाहनांच्या मालकांना अनुक्रमे रुपये ३,११,७६०/- व रुपये ३,६७,६४०/- इतक्या दंडात्मक रक्कमेची नोटीस पारीत करण्यात आली असून त्यापैकी एका वाहनाच्या मालकाने रुपये ३,६७,६४०/- इतकी दंडात्मक रक्कम शासनजमा केली असल्याने सदर वाहन दिनांक १९/४/२०१८ रोजीच्या आदेशान्वये सोडण्यात आले आहे. तर दुसऱ्या वाहनाच्या मालकाने मा.मुंबई उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद येथे रिट याचिका दाखल केली असून सदर याचिका न्यायप्रविष्ट आहे.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## लांजा-कोर्ले (जि.रत्नागिरी) तालुक्यात वणव्यामुळे बाधित बागायतदार शेतकऱ्यांना मदत देण्याबाबत

**(४२) ४३३०५ (०२-०८-२०१८). श्री.प्रविण दरेकर :** सन्माननीय **मदत व पुनर्वसन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) लांजा-कोर्ले (जि.रत्नागिरी) तालुक्यातील रहिवाशी रमाकांत शंकर साळुंखे यांच्या पंधरा एकर जमिनीवरील आंबा व काजू कलमे अचानकपणे लागलेल्या वणव्यात जळून गेल्याने लाखो रुपयांचे नुकसान झाल्याची घटना माहे एप्रिल, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान घडली आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदर आग लागण्याची कारणे काय आहेत,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने नुकसानग्रस्तांना आर्थिक मदत देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (१७-०९-२०१८) :** (१) होय, हे खरे आहे.
(२) आगीचे कारण समजू शकले नाही.
(३) तलाठी, ग्रामसेवक व कृषी सहाय्यक यांच्याकडून पाहणी करुन पंचनामे करण्यात आले असून आगीचे कारण समजू शकले नाही. दिनांक १३ मे, २०१५ च्या शासन निर्णयानुसार नैसर्गिक आपत्तीमध्ये शेतीपिकाचे नुकसान झाल्यास मदत अनुज्ञेय आहे. सदर घटना नैसर्गिक आपत्तीमध्ये येत नसल्याने आर्थिक मदत देण्यात आलेली नाही.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## कांदिवली पूर्व (मुंबई) येथील सलीम कंपाऊंडची महसूली जागा बांधकाम कामगार, घरेलू कामगार कल्याण व क्रीडा केंद्राकरीता देण्याबाबत

**(४३) ४३३२७ (०२-०८-२०१८). श्री.प्रविण दरेकर :** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) कांदिवली पूर्व (मुंबई) येथील सलीम कंपाऊंडची महसूली जागा बांधकाम कामगार, घरेलू कामगार कल्याण व क्रीडा केंद्राकरीता देण्याबाबतचा अहवाल शासनास सादर करण्याबाबत अवर सचिव, महसूल व वन विभाग यांनी दिनांक २३ मार्च, २०१८ रोजी वा त्यासुमारास जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर जिल्हा, मुंबई यांना पत्र दिले होते, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, या प्रकरणी शासनास अहवाल प्राप्त झाला आहे काय,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (२९-१०-२०१८) :** (१), (२) व (३) कांदिवली पूर्व (मुंबई) येथील सलीम कंपाऊंडची महसूली जागा बांधकाम कामगार व घरेलू कामगार कल्याण व क्रीडा केंद्राकरीता देण्याबाबत लोकप्रतिनिधींचे दिनांक ०७/०३/२०१८ रोजीचे पत्र शासनास प्राप्त झाले होते. सदर पत्रानुषंगाने जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर यांच्याकडून दिनांक २३ मार्च, २०१८ रोजी अहवाल मागविण्यात आला आहे.

सदर प्रकरणी जिल्हाधिकारी यांचा अहवाल अद्याप अप्राप्त आहे. तथापि, जिल्हाधिकारी कार्यालय या विषयाबाबत क्षेत्रियस्तरावरुन माहिती संकलीत करीत असून लवकरच अहवाल अपेक्षित आहे.

---

## राज्यातील राज्य परिवहन महामंडळाच्या बस स्थानकांचा दर्जा सुधारण्याबाबत

**(४४) ४३५०० (०२-०८-२०१८). श्री.अमरिशभाई पटेल :** सन्माननीय **परिवहन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यातील राज्य परिवहन महामंडळाच्या बस स्थानकांचा दर्जा सुधारणा करुन प्रत्येक स्थानकांवर वातानुकूलित वेटिंग रुम व शौचालय उभारण्याकरीता रुपये १०० कोटींची तरतूद करण्यात येणार असल्याचे माहे मार्च, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान मा.परिवहन मंत्री यांनी आश्वासन दिले होते, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदरील आश्वासनाच्या अनुषंगाने अंमलबजावणी करुन त्याची कार्यवाही करण्यात आली काय, सदर प्रकरणी केलेल्या कार्यवाहीचा संपूर्ण तपशील काय आहे,
(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.दिवाकर रावते (२४-०९-२०१८) :** (१) होय.

(२) व (३) राज्य परिवहन महामंडळाच्या जुन्या झालेल्या, तसेच, विस्तारीकरण करणे आवश्यक असलेल्या बस स्थानकांची दर्जावाढ/आधुनिकीकरण/पुनर्बांधणी करण्याची कामे सुरु आहेत, त्यामध्ये वातानुकूलित प्रवासी प्रतिक्षालयाचा समावेश आहे. सद्य:स्थितीत स्वारगेट, पुणे रेल्वे स्टेशन व दादर एशियाड, अहमदनगर व औरंगाबाद या बसस्थानकांवर वातानुकूलित प्रवासी प्रतीक्षालयाची सुविधा असून, वातानुकूलित शिवशाही बसेसही सुरु करण्यात आलेल्या आहेत. भारत पेट्रोलियम कॉर्पोरेशन लि. यांनी, सामाजिक दायित्व निधीतून २२ ठिकाणच्या बसस्थानकांवर अद्यावत प्रसाधनगृह बांधण्यासाठी पहिल्या टप्प्यामध्ये रुपये ४.९० कोटी निधी उपलब्ध करुन देण्याचे मान्य केले आहे.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## प्रादेशिक परिवहन कार्यालयातील रिक्त पदे भरण्याबाबत

**(४५) ४३६५८ (०२-०८-२०१८). श्री.विक्रम काळे :** सन्माननीय **परिवहन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील प्रादेशिक परिवहन कार्यालयातील अ ते ड संवर्गातील अनेक पदे रिक्त असल्याने कार्यरत असलेल्या अधिकारी व कर्मचाऱ्यांवर कामाचा अधिक ताण पडत असल्याने त्याचा परिणाम वाहनाच्या संदर्भातील सर्व प्रकारच्या कामावर होत आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, प्रादेशिक परिवहन कार्यालयातील गट अ ते ड वर्गातील अधिकारी व कर्मचारी यांची वर्गनिहाय किती पदे रिक्त आहेत,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने गट अ ते ड वर्गातील अधिकारी व कर्मचारी यांची रिक्त पदे भरण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.दिवाकर रावते (१८-०९-२०१८) :** (१), (२) व (३) दिनांक ३०/६/२०१८ रोजी, मोटार वाहन विभागासाठी गट अ ते ड संवर्गातील पदांची माहिती खालीलप्रमाणे :-

| गट | मंजूर पदे | भरलेली पदे | रिक्त पदे |
|---|---|---|---|
| **अ** | ९६४ | ६२१ | ३४३ |
| **ब** | १४४ | ८८ | ५६ |
| **क** | ३५६५ | १८५६ | १७०९ |
| **ड** | ४२७ | १८५ | २४२ |
| **एकूण** | **५१००** | **२७५०** | **२३५०** |

गट अ संवर्गापैकी ३०० मोटार वाहन निरीक्षक व गट क संवर्गापैकी ७०० सहाय्यक मोटार वाहन निरीक्षक ही पदे नव्याने निर्माण करण्यात आली आहेत.

सहाय्यक प्रादेशिक परिवहन अधिकारी संवर्गातील अधिकाऱ्यांची सरळसेवेच्या कोट्यातील ४ पदांचे मागणीपत्र महाराष्ट्र लोकसेवा आयोगास पाठविण्यात आले आहे. मोटार वाहन निरीक्षक संवर्गातील ६७ पदे पदोन्नतीने भरण्यात आली आहेत. तसेच सेवा प्रवेश नियमानुसार पदोन्नतीने भरावयाची पदे सर्वोच्च न्यायालयात दाखल विशेष अनुज्ञा याचिका क्र. २८३०६/२०१७ मधील निर्णयाच्या अनुषंगाने सामान्य प्रशासन विभागाने जारी केलेल्या मार्गदर्शक सूचनांनुसार पदे तदर्थ पदोन्नतीने भरण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधिन आहे.

गट ब संवर्गातील रचना व कार्यपद्धती अधिकारी, प्रशासकीय अधिकारी, प्रक्रिया योजनक, प्रणाली प्रशासक व जनसंपर्क अधिकारी या पदांवर पदोन्नती देण्याचा प्रस्ताव विचाराधिन आहे.

गट क संवर्गातील सहाय्यक मोटार वाहन निरीक्षक पदांसाठी महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने ८३२ उमेदवारांची शिफारस केली असून, त्यांची नियुक्ती प्रक्रिया मा.उच्च न्यायालयाच्या आदेशानुसार तुर्तास स्थगित ठेवण्यात आली आहे.

बृहन्मुंबई बाहेरील कार्यालयांतील लिपीक टंकलेखक संवर्गातील ८८ पदे बाहय स्त्रोतांद्वारे भरण्यात आलेली आहेत. तसेच १७६ कंत्राटी

लिपिक-टंकलेखक व ३८ कंत्राटी वाहनचालक भरण्याकरीता मा.मुख्य सचिवांचे अध्यक्षतेखालील समिती मान्यता दिले असून त्यानुसार कार्यवाही करण्यात येत आहे.

गट ड संवर्गातील सरळसेवेची पदे भरण्याचा प्रस्ताव अ.मु.स. (सेवा), सामान्य प्रशासन विभाग यांच्या अध्यक्षतेखालील समितीने अमान्य केला आहे.

उपलब्ध मनुष्यबळाचा वापर करुन दैनंदिन कामपूर्ण करण्यात येत असल्याने, दैनंदिन कामकाजावर परिणाम होत नाही.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## नगर जिल्हयात जिल्हा अपंग पुनर्वसन केंद्रास जागा मिळण्याबाबत

**(४६) ४३७१८ (०१-०८-२०१८). डॉ.सुधीर तांबे, श्री.शरद रणपिसे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.रामहरी रुपनवर, अॅड.हुस्नबानू खलिफे, श्री.आनंदराव पाटील, श्री.अमरनाथ राजूरकर, श्री.सुभाष झांबड, श्री.हरिसिंग राठोड, प्रा.जोगेन्द्र कवाडे :** सन्माननीय **सामाजिक न्याय मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मुंबईतील राज्य अपंग वित्त विकास महामंडळाने नगरला जिल्हा अपंग पुनर्वसन केंद्र (डिस्ट्रीक डिसेबल्ड रिहॅबिलेटेशन सेंटर) मंजूर केले असून यासाठी निधी व कर्मचारी व्यवस्थाही मंजूर झाली आहेत परंतु नगर जिल्हयातील अपंगांसाठी (दिव्यांग) जिल्हा अपंग पुनर्वसन केंद्रास अद्‌यापपावेतो हक्काची जागाच मिळाली नसल्याचे माहे मार्च, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी अपंग पुनर्वसन केंद्रास जागा उपलब्ध करुन देण्यास विलंब होण्याची कारणे काय आहेत व सदरील केंद्रास जागा उपलब्ध झाली असल्यास ते केव्हा सुरु करण्यात येणार आहे,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुसार कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.राजकुमार बडोले (१३-११-२०१८) :** (१) अंशत: खरे आहे.
(२) अपंग पुनर्वसन केंद्रास जागा उपलब्ध करुन देण्यासाठी कार्यवाही सुरु आहे.
(३) व (४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्यातील कापूस बियाणांचे सरळवाण विकसित करण्याबाबत

**(४७) ४३७६१ (०२-०८-२०१८). डॉ.(श्रीमती) नीलम गोऱ्हे :** सन्माननीय **कृषी मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यातील कापसाच्या पेरणीकरीता प्रत्येक हंगामात सुमारे दोन कोटी संकरित कापूस बियाणांची पाकीटे लागतात, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, संकरित कापूस बियाणे खाजगी व्यापाऱ्याकडून जादा दराने शेतकऱ्यांना विकत घ्यावे लागते, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने कापसाचे सरळ वाण विकसित करुन शेतकऱ्यांना त्यांच्या पूर्वापार चालत आलेल्या शेतीकडे कमी खर्चाची शेती करण्यास प्रोत्साहन देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (०६-११-२०१८) :** (१) राज्यातील कापूस पिकाखालील क्षेत्र सुमारे ४२ लाख हेक्टर इतके आहे. त्यासाठी सर्वसाधारणपणे दरवर्षी राज्यात सुमारे १.५ कोटी कापूस बियाणांची पाकीटे लागतात.
(२) हे खरे नाही.

बी.टी. कापूस बियाणांच्या किंमती केंद्र शासनाकडून निश्चित करण्यात येतात. बियाणांची जादा दराने विक्री करीत असल्याचे निदर्शनास आल्यास संबंधित विक्रेत्यांवर कायद्यातील तरतुदींनुसार कार्यवाही करण्यात येते.

(३) सद्य:स्थितीत महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ मर्यादीत (महाबीज), अकोला यांच्याकडून शेतकऱ्यांना माफक दरात कापसाचे सरळवाण उपलब्ध करून देण्यात येत आहे. तथापि, शेतकऱ्यांचा कल हा बी.टी. कापूस बियाणांकडे असल्यामुळे दिवसेंदिवस सरळवाणांची मागणी कमी होत आहे. तसेच, राज्यातील कृषी विद्यापीठांकडे कापसाचे सरळवाण उपलब्ध आहेत. कापसाच्या सरळवाणामध्ये बी.टी. जनुक प्रत्यारोपीत करण्याचे कार्य केंद्रीय कापूस संशोधन संस्था, नागपूर यांच्यामार्फत करण्यात येत आहे. तसेच, कृषी विद्यापीठामार्फत शेतकऱ्यांच्या शेतावर प्रात्यक्षिकांचे आयोजन करून कमी खर्चाचे सुधारीत तंत्रज्ञान शेतकऱ्यांपर्यंत पोहचवून त्यांना त्याचा अवलंब करण्याकरीता प्रोत्साहन देण्यात येत आहे.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## शासनाकडून परदेशात पदवी, पदव्युत्तर शिक्षणासाठी शिष्यवृत्ती मिळणेबाबत

**(४८) ४३८१२ (०१-०८-२०१८). श्री.रविंद्र फाटक :** सन्माननीय **सामाजिक न्याय मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) परदेशात उच्च शिक्षण घेऊन स्वतःबरोबर देशाचे नाव उज्ज्वल करण्याची संधी अनुसूचित जाती-जमातीतील गरीब विद्यार्थ्यांना मिळावी, याकरीता शासनाकडून परदेशात पदवी, पदव्युत्तर शिक्षणासाठी शिष्यवृत्ती दिली जाते, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, गेल्या वर्षात अवघ्या ३० विद्यार्थ्यांनीच या योजनेंतर्गत शिक्षणासाठी परदेशगमनाचा लाभ घेतल्याचे निदर्शनास आले आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, सदर योजनेचा लाभ घेण्याकरीता जास्तीत जास्त अर्ज यावेत याकरीता शासनस्तरावर कोणत्या उपाययोजना आखण्यात आल्या आहेत वा येत आहेत,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.राजकुमार बडोले (१५-११-२०१८) :** (१) अंशत: खरे आहे.

राज्यातील अनुसूचित जाती प्रवर्गातील विद्यार्थ्यांना परदेशात विशेष अध्ययन करण्यासाठी राजर्षी शाहू महाराज शिष्यवृत्ती योजना सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागामार्फत राबविली जाते.

(२) हे खरे नाही.

अनुसूचित जाती प्रवर्गातील विद्यार्थ्यांना उच्च शिक्षणासाठी परदेशी शिष्यवृत्ती योजनेंतर्गत सन २०१७-१८ वर्षामध्ये ४५ विद्यार्थ्यांची निवड करण्यात आली असून त्यापैकी ३३ विद्यार्थ्यांनी प्रत्यक्ष परदेशातील विद्यापीठात प्रवेश घेतलेला आहे. ३ विद्यार्थ्यांनी नकार कळविला आहे व १ विद्यार्थी कारण न देता परदेशात गेलेला नाही. तसेच ८ विद्यार्थ्यांनी परदेशातील विद्यापीठात प्रवेश मुदतवाढ मिळणेबाबत अर्ज केला आहे.

(३) सदरहू योजनेंतर्गत जास्तीत जास्त अर्ज यावेत याकरीता मा.महासंचालक, माहिती व जनसंपर्क, मुंबई यांचे मार्फत वृत्तपत्रामध्ये व्यापक स्वरुपाची प्रसिध्दी केली जाते. तसेच शासनाच्या संकेतस्थळावर देखील प्रसिध्दी केली जाते.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## अमळनेर (जि.जळगांव) येथील तलाठी व मंडळाधिकारी नेमणुकीच्या ठिकाणी राहत नसल्याबाबत

**(४९) ४३८३७ (०२-०८-२०१८). श्रीमती स्मिता वाघ :** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील तलाठी व मंडळ अधिकारी यांना नेमणुकीच्या ठिकाणी राहण्याबाबत शासन निर्णय शासनामार्फत निर्गमित करण्यात आला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, अमळनेर (जि.जळगांव) येथील तलाठी व मंडळ अधिकारी नेमणुकीच्या ठिकाणी राहत नसल्याने नागरिकांना अडचणीना सामोरे जावे लागत आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने राज्यातील तलाठी व मंडळ अधिकारी यांना नेमणुकीच्या ठिकाणी राहण्याबाबत शासन निर्णय निर्गमित करुन अमळनेर (जि.जळगांव) येथील तलाठी व मंडळ अधिकारी नेमणूकीच्या ठिकाणी राहण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (२५-१०-२०१८) :** (१) दिनांक ०६ जानेवारी, २०१७ च्या शासनपत्रान्वये, सर्व जिल्हाधिकाऱ्यांना, ज्या सजांच्या ठिकाणी तलाठी / मंडळ अधिकारी यांना शासनाने निवासस्थाने उपलब्ध करुन दिली आहेत, त्यांनी त्या निवासस्थानी राहण्याच्या सूचना देण्याबाबत कळविण्यात आले आहे.

तसेच शासन निर्णय वित्त विभाग क्र. घभाभ-१०१५/प्र.क्र.१/सेवा-५, दिनांक ०७/१०/२०१६ नुसार घरभाडेभत्ता पात्रतेसाठी ग्रामीण भागातील कर्मचाऱ्यांना कामाच्या ठिकाणी वास्तव्य करणे आवश्यक आहे.
(२) अशी बाब नाही.
(३) व (४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## अमळनेर (जि.जळगांव) येथील तालुका प्रशासकीय इमारतीच्या बांधकामाबाबत

**(५०) ४३८४६ (०१-०८-२०१८). श्रीमती स्मिता वाघ :** सन्माननीय **सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम वगळून) मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) अमळनेर (जि.जळगांव) येथील तालुका प्रशासकीय इमारत बांधकामाचा प्रस्ताव वित्त विभागाची सहमती नसल्यामुळे प्रलंबित असल्याचे निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रस्ताव प्रलंबित असल्याने अमळनेर येथील अनेक शासकीय कार्यालये खाजगी जागेत भाडे तत्वावर असल्याचेही निदर्शनास आले, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, तालुका प्रशासकीय इमारत बांधकामाचा प्रस्ताव प्रलंबित असल्याची कारणे काय,
(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन तालुका प्रशासकीय इमारत बांधकाम करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (०२-११-२०१८) :** (१) खरे नाही
(२), (३) व (४) अमळनेर (जि.जळगाव) तालुका प्रशासकीय इमारतीचे अंदाजपत्रक या विभागास प्राप्त झाले असून निधी व निकष या आधारे प्रशासकीय मान्यता देण्याची कार्यवाही प्रगतीत आहे.
(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

**विधान भवन :**
**मुंबई.**

**डॉ. अनंत कळसे**
**प्रधान सचिव,**
**महाराष्ट्र विधानपरिषद.**

---

मुद्रणपूर्व सर्व प्रक्रिया महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालयाच्या संगणक यंत्रणेवर करण्यात आली आहे.
मुद्रण: शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय, मुंबई.